**त्रिविध परीक्षा.** (रोग्याची) दर्शन, स्पर्शन, प्रश्न.

**त्रिविध प्रारब्ध.** अनिच्छाप्रारब्ध, इच्छाप्रारब्ध, परेच्छाप्रारब्ध.

**त्रिविधमंगल.** आशीर्वादात्मक, वस्तुनिर्देशात्मक, नमस्कारात्मक.

**त्रिविध संबंध.** अभिधानसंबंध अ० शब्दार्थसंबंध, लक्षणासंबंध, व्यंजनसंबंध.

**त्रिविधाहंकार.** सात्विक, राजस, तामस.

**त्रिस्थली यात्रा.** काशी, प्रयाग, गया (या स्थलीं).

**त्रैगुण्य.** सत्व, रज, तम.

**त्रैराशिक.** (प० भा०)आद्यंक,मध्यांक,अंत्यांक अ० इच्छांक; अ० आदि, मध्य, अंत अ० इच्छा. अ० आदि, प्रमाण, इच्छा, इच्छाफल. प्र० क्रम त्रैराशिक आणि व्यस्त त्रैराशिक.

## द.

**दशकामज व्यसनें.** मृगया, द्यूत, दिवसा निजणें, असत् व्यापार, स्त्रीव्यसन, मद्यपान, नृत्य, गायन, क्रीडा, दंभ.

**दशग्रंथ.** संहिता, ब्राह्मण, अरण, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंट, निरुक्त, छंद, ज्योतिष.

**दशदानें.** गो-भूमि-तिल-सुवर्ण- घृत- वस्त्र- धान्य- गुड- लवण- दान

**दिक्पाल.** (दाहा) इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम, ईशान, अनंत, ब्रह्म.

**दीप.** प्र० ध्यानदीप, चित्रदीप, नाटकदीप, तृप्तिदीप, कूटस्थदीप—पंचदशी ग्रंथ.

**दारूकाम.** प्र० चंद्रबाजी, भुइनळा, नळा, चंद्रजोत, तारा, चाप-चिचुंद्री, जातीण, पेटी, फुलझडी, फुलबाजी, महताब, शिंगट, सुरसुरी, हातनळा, लंका, दारूचा डल्ला, फटाका, बाण.

**देवर्षी.** नारद, अत्रि, मरीची, भरद्वाज, तुंबरु, इ०

**देश.** (याच्याखालीं) प्रांत, सुभा, परगणा, तालुका, जिल्हा, महाल, कसबा, पेटा, फुटा, मौजा, सम्मत, तरफ.

**देहत्रय.** स्थूलदेह, लिंगदेह, कारणदेह.

**देहद्वय.** स्थूलदेह, लिंगदेह अ० सूक्ष्मदेह.

**दैवत.** ज्ञा० अश्वर, अनिळ, आदित्य, कामरूपी, किन्नर, कूष्मांड, खेचर, गंधर्व, ग्रह, चाळा, देवचार, नाग, भूत, मारुत, यक्ष, रुद्र, वसु, वालखिल्य, विद्याधर, विश्व, साध्य, सिद्ध.

**द्वादशविध पुत्र.** औरस, क्षेत्रज, दत्त, कृत्रिम, गूढोत्पन्न, उपविद्ध, कानीन, सहोढ, क्रीत, पौनर्भु स्वयंदत्त, शौद्र. श्लोक. औरसः क्षेत्रजश्चैवदत्तः कृत्रिमएवच ॥ गूढोत्पन्नोपविद्धश्च दायादाबांधवाश्चषट् ॥१॥ कानीनश्चसहोढश्च क्रीतपौनर्भवस्तथः ॥ स्वयंदत्तश्च शौद्रश्च षडदायादबांधवाः ॥२॥

## ध.

**ध्रुपद.** (याचे भाग) अस्ताई, अंत्रा, आभोग.

## न.

**नंद** (भाषा दलालाची). भुरका ह्मणजे रुपया, ढोकला ह्म० पैसा, केवली ह्म० एक, आवारू ह्म० दोन, उधानु ह्म० तीन, पोकू ह्म० चार, मुळू ह्म० पांच, शेलो ह्म० साहा, पवित्र ह्म० सात, मंगी ह्म० आठ, तेवसू अ० लेव्नु ह्म० नऊ, अंगुळू ह्म० दाहा, एकडू ह्म० अकरा, रेघी ह्म० बारा, ठेपरू ह्म० तेरा, चोपडू ह्म० चौदा, वळी ह्म० पंधरा. (याच्यापुढें तान लाविला ह्मणजे सोळा, सत्रा, अठरा, एकुणीस होतात. जसें भुरका तानवळी, अवारूतानवळी, उधानुतानवळी, पोकूतानवळी). काटि ह्म० वीस (जसें भुरकातान काटी, अवारूतानकाटी, ह्म० एकवीस, बावीस इत्यादि). बिटी ह्म० शभर, ढकार ह्म० हजार, फाटा ह्म० आणा, आवारू फाटे ह्म० दोन आणे, मंगी फाटे ह्म० आठ आणे, वळीफाटे ह्म० पंधरा आणें डुकार ह्म० एक आणा, चकार ह्म० दोन आणे, पकार ह्म० चार आणे, टाली ह्म० अर्धा रुपया. **अभंग.** मुळू ५वदनाचा उधानु ३ नेत्राचा ॥ अंगुळू १० हातांचा स्वामी माझा ॥१॥ मुगुट जयाचा केवळ्या १ आगळी काटि २१ पवित्र ७ तत्वटींचरण ज्याचे ॥२॥ ढकार १००० वदनाचा, आला वर्णावया ॥ जिव्हीयाच्या चिरल्या वर्णवेना ॥३॥ शेलीं ६ वेडावली पोकू ४ मौनावली ॥ अं-

गुरू मंगी १८ थकलीनकळे त्यांशी ||४|| सदभावें शरण आवाह्न २ जोडून || खेचरवीसा ह्मणे स्वामी माझा.

**नमन.** प्र० दंडवत, रामराम, मुजरा, सलाम,कुरानिशात, कुरनीस, अभिवंदन, आदेश, जयगोपाळ, जोहार, आशीर्वाद, जयशितराम, शिरसाष्टांग, नमस्कार, साष्टांग प्रणाम.

**नरक.** प्र० अंधतामिस्त्र, अवीचीस्त्र, असिपत्रवन, कुंभीपाक,तपन, तप्तवालुका, तामिस्त्र, महारौरव, रौरव, लोहभूमि, संघात.

**नव खंडें.** (जंबुद्वीपाचीं) इलावृत, भद्राश्व, हरिवर्ष, किंपुरुष,केतुमाल, रम्यक, भरत, हिरण्मय, उत्तरकुरू. २. भरत,वर्त, राम, द्रामाळा, केतुमाल , हिरे, विधिवस, महि, सुवर्ण. विवेक सिंधु ग्रंथ.

**नव ग्रह.** सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनि,राहू, केतु.

**नव नाग.** अनंत, वासुकी, शेष, पद्मनाभ, कंबल, शंखपाल, धृतराष्ट्र, तक्षक, कालीय.

**नव रत्नें.** हिरा, माणीक, मोतीं, गोमेद, इंद्रनील, पाच, प्रवाल, पुष्कराज, वैडूर्य अ० तोर्मळी.

**नव रस.** शृंगार, हास्य, करुण,रौद्र, वीर,भयानक, बीभत्स, अद्भुत, शांत.

**नवविधा भक्ति.** श्रवण,कीर्त्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन,वंदन दास्य, सख्य,आत्मनिवेदन.

**नक्षत्रें.** (सत्तावीस) अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृग, आर्द्रा, पुनर्वसू, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाति, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका,पूर्वा भाद्रपदा, उत्तरा भाद्रपदा, रेवती, अभिजित, उत्तराषाढा.

**नाडी.** आदिनाडी, मध्यनाडी, अंत्यनाडी. २ कफनाडी, पित्तनाडी, वातनाडी.

**नारीदूषण.** अनृत, साहस, माया, मूर्खत्व, अतिलभिता, अपवित्रत्व अ० अशौच, निर्दयत्व .२ पान, दुर्जनसंग, पतिविरह, नटन, अन्यगृहवासः. स्वप्न.

**नास्तिकमतें.** प्र० सौत्रांतिक, योगाचार्य, माध्यमिक, क्षपणक, चार्वाक, शून्य, परिच्छिनात्म, क्षणिकविज्ञान, प्रत्यक्ष.

**नीति.** प्र० धर्मनीति, प्रपंचनीति, लोकनीती, व्यवहारनीति, शास्त्रनीति. २ अंगद-नारद-कनक-बृहस्पती-विदूर-वृद्धचाणाक्य, शुक्रनीति.

**न्याय.** (भाग) प्रतिज्ञा, हेतु, उदाहरण, उपनयन, निगमन.

**न्यास.** प्र० महान्यास, लघुन्यास, षडंगन्यास, कर्मन्यास, फल-सवन्यास

## प.

**पंचकर्मे.** उपक्षेपण, अपेक्षण, आकुंचन, प्रसारण, गमन.

**पंचकोश.** (आत्म्याचे) अन्नमय-प्राणमय-मनोमय-विज्ञानमय-आनंदमयकोश.

**पंचखाद्य.** खारीक, खोबरें, खसखस, खिसमीस, खडीसाखर.

**पंचगंगा.** कृष्णा, वेण्णा, कोयना, गायत्री, सावित्री.

**पंचगति.** (घोड्याच्या) भरपल्ला अ० चवडचाल, तुर्की अ० गामचाल, दूर्की, बाजीचाल, चौकचाल. (संस्कृत) आस्कंदित, धौरीतक, रेचित वाल्गित, प्लुत.

**पंचगव्य.** (गाईचें) दूध, दहीं, तूप, मूत व शेण.

**पंचगौड.** गौड, कनोज, मैथिल, मिश्र, गुर्जर. २ सारस्वत, कान्यकुब्ज, गौड, उत्कल, मैथिल.

**पंचग्रंथ.** (यजुर्वेदाचे) संहिता, ब्राह्मण, अरण, पदें, क्रम.

**पंचतत्वें.** पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश.

**पंचतन्मात्रें. पंच महाभूतें.** पाहा.

**पंचद्रवीड.** तैलंग, द्राविड, कर्नाटक, महाराष्ट्र. कोंकण-२ द्राविड, महाराष्ट्र, तैलंग, कर्नाटक, गुर्जर.

**पंचधान्यें.** गहूं, तांदूळ, जव, तीळ, मूग.

**पंचधान्याचा काढा.** (ह्याचे जिन्नस) भणा, वाळा, सुंठ, नागरमोथा, दालचिनी.

**पंचधारा.** तोंडाची लाळ, नाकांतला शेंबूड, दोन डोळ्यांत ले अश्रू.

**पंचप्राण.** प्राण, अपान, समान, उदान, व्यान.

**पंचबाण.** (कामदेवाचे) अरविंद, अशोक, नवमल्लिका, अ० मोगरा, निलोत्पल च्यूत

**पंचमहापातकें.** ब्रह्महत्या, सुरापान, सुवर्णचौर्य, मात्रागमन अ० गुरुपत्निगमन, आणि तत्संग, ह्म० ह्या चोहोंतून कोणतेंही करणाराशीं संगत.

**पंचमहाभूतें.** पृथ्वी, उदक, वायु, तेज, आकाश. २ (सूक्ष्मरूप) गंध, रस रूप, स्पर्श, शब्द.

**पंचमहायज्ञ. अ० पंचयज्ञ.** देवयज्ञ, भूतयज्ञ अ० ब्रह्मयज्ञ-ऋषियज्ञ अ० आतिथियज्ञ, पित्रयज्ञ, मनुष्ययज्ञ.

**पंचरत्नें.** सुवर्ण, रूपें, पविळें, मोतीं, राजावर्त.

**पंचलोह.** तांबें, पितळ, कथील, सिसें, लोखंड.

**पंचवकार.** विद्या, वपु, वाचा, वस्त्र, विभव. **श्लोक.** विद्ययावपुषा, वाचा वस्त्रेण विभवेनवः ॥ वकारैः पंचभिर्हीनोनरोनाप्नोति गौरवं॥

**पंचविषय.** शब्द, रूप, स्पर्श, गंध, रस.

**पंचस्कंध.** रूप, वेदना, विज्ञान, संज्ञा, संस्कार.

**पंचस्नानें.** प्रातःस्नान, संगवस्नान . मध्यानस्नान, अपरान्हस्नान, सायान्हस्नान.

**पंचहत्यारें.** ढाल, तरवार, तीरकमान, बंदूक, भाला, २ तीरकमान, बंदूक, ढाल, तरवार, पेश, कबज.

**पंचांग.** (पांच अंगें) तिथि, वार, योग, नक्षत्र, करण.

**पंचामृत.** पय, दधि, घृत, मधु, शर्करा.

**पंचायतन.** शिव, विष्णु, सूर्य, गणपति, देवी.

**पंचाळ.** सोनार, सुतार, लोहार, कासार, पाथरवट.

**पंचेंद्रिय.** नेत्र, कर्ण, नासिक, जिव्हा, त्वचा.

**पंचोपचार.** गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य.

**पंचोपप्राण.** नाग, कूर्म, कृकल, धनंजय, देवदत्त.

**पट्टी.** प्र० खारी पट्टी, पालखीपट्टी, गोसावीपट्टी, खुशालपट्टी, लग्नपट्टी, केरपट्टी, घरपट्टी, कोंबडीपट्टी, झाडपट्टी, म्हैसपट्टी, सरकारदेणें, पट्टा.

**पदार्थ.** (सप्त) द्रव्य, गुण, सामान्य, विशेष, समवाय, अभाव, कर्म.

**परिमाण.** अणुपरिमाण, महत्परिमाण, परममहत्परिमाण.

**पुराणें.** (अठरा) ब्रह्म, पद्म, विष्णु, शिव, लिंग, गरूड, नारद, भागवत, आग्नि, स्कंद, भविष्य, ब्रह्मवैवर्त्त, मार्कंडेय, वामन, वाराह, मत्स्य, कूर्म.

**पुरुषार्थ चतुष्टय.** धर्म, अर्थ, काम, मोक्ष.

**प्रमाण.** प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द. २ भोग, लेख, साक्ष्य, दिव्य.

**प्रमाणालंकार.** (आठ) प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शाब्द, अर्थापत्ति, अनुपलब्धी, संभव, ऐतिह्य.

**प्रमेह.** प्र० उदक- यिक्षु- सांद्र- सुरापिष्ट- शुक्र- शिकता- शीत -शनैर लाला- क्षार- काल- हरिद्रा- मंजिष्ट- रक्त- वसा- हस्ती- मधु- मज्जा- निल- प्रमेह.

**प्राण.** पंचप्राण पाहा.

**प्याला.** प्र० तांब्या, चंबू, सुरा, अमृती, अपकरा, कटोरा, जगन्नाथी, जाम, तांबली, पितळी, फुलपात्र, वतेला, रामपात्र, वाटी, वाटगा, संपुष्ट, पंचपात्र, गडू, लोटी, गडवा, गडवी.

## ब.

**बलुतेदार.** सुतार, लोहार, महार, मांग, (पहिली कास). कुंभार, चांभार, परीट, न्हावी (दुसरी कास) भट, मलना, गुरव, कोळी, (तिसरी कास). -अलुतें. तेली, तांबोळी, माळी, साळी, जंगम, कळवांत, डवऱ्या, ठाकर, घडशी, तऱ्हाळ, सोनार, चौगुला. २

पाटील, कुळकरणी, चौधरी, पोतदार, देशपांड्या, म्हार्वी, परीट, गुरव, सुतार, कुंभार, वेस्कर, जोशी.

**बाह्यप्रकृति.** कोष, राष्ट्र, दुर्ग, बल.

**बाराज्योतिर्लिंगें.** सोमनाथ, महाकाल, केदार, विश्वेश्वर, ओंकारेश्वर, त्र्यंबकेश्वर, घृष्णेश्वर, नागनाथ, वैद्यनाथ, भीमाशंकर, मल्लिकार्जुन, रामेश्वर. (यांची जागा) सोरट, उज्जनी, बदरी, काशी, महेश्वर, त्र्यंबक, एरूळ, अवंढें, परळी, भीमा, श्रीशैल, सेतुबंध.

**बाराबावती.** विडा, टिळा, शेला, वाटी, गणसवाशीण, इ०

**बारा महाल.** पोतेंमहाल, कोठीमहाल, पागाम०, दरजीम०, टंकसाळ म०, सौदागिरी म०, इमारत म०, पालखी म०, थट्टी म०, चौंबिनाम०, शरीम०.

**बारामहिने.** चैत्र, वैशाख, ज्येष्ट, आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्त्तिक, मार्गशीर्ष, पौष, माघ, फाल्गून.

**बाराराशि.** मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तुला, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ, मीन.

**बाराहक्कदार.** देशमुख, देशपांड्या, सरपाटील, कुळकरणी, पानसऱ्या, शेट्या.

**बेळ.** जा० वाळंतबोळ, रक्तयाबोळ, भ० तांबडाबोळ.

**ब्राह्मण.** (गोत्र) कपि, कौंडिन्य, कौशिक, भारद्वाज, गार्ग्य, बाभ्रव्य, काश्यप, शांडिल्य, नित्युंदन, वत्स, आत्रि, वासिष्ट, विष्णुवर्द्धन, जामदग्न्य; (शाखा) वाजसनी, तैतिरी, शाकल, बाष्कळ, यजर्वेदी अ० यजुशाखी, अपस्तंभ, (जाती) करवंत, कऱ्हाडा, कुडाळ देशकर, कोंकणस्थ अ० चितपावन अ० चिपळुणा, गौड, चौंवा, जवळ, निरगूळ, तुळवा, तेलंग, देवरूखा, देशस्थ, गुर्जर, मध्यंदिन अ० माध्यंजन, मिश्र, मैत्रायणी, मोनाळा, सवाशा; सारस्वत, गोळक, पळशा. (उपनाम) गद्रे, वैशंपायन, देव, रानडे, महाजन, फडके, काळे, भडभडे, खेर, नेने थत्ते, दातारें, रास्ते, पराजपे, नामेकर, बिवलकर, आठवले, नाटेकर, गोखले, ओक, गोडबोले.

## भ.

**भक्ति.** प्र० भक्तिमार्ग, कर्ममार्ग, ज्ञानमार्ग.

**भस्म.** प्र० ताम्रभस्म, पारदभ० रसभ० प्रवालभ० मौक्तिकभ० लोहभस्म, वंगभ० सुवर्णभ० माक्षिकभ० अभ्रकभ० गंधकभ० हीरकभ० रत्नभस्म.

**भांडीं.** प्र० अमृती, अपक्करा, उभा तांब्या, उरोळी, ओळक, कचोळें, कढई, कटाह, कटोरा कटोरी, कथली, कलश, कळशी, कासंडी, कुळणी, केळी, गंगाळ, गडवा, गडू, गिंडी, गुंड, चंबू, टोप, डेग, डेगचा, तपेलें, तपेली, तवली, तवी, तसराळें, तांब्या, तुंग, तांबली, थाळ्या, द्रोणी, पंचपात्र, परात, बगुणें, बिनगा, बुटली, लोटा, शिपला, सुरई. (मातीचीं) कटोरा, कन्ह, कळसा, कुंडी, केळी, गाडगा, गाडगें, गाडला, गोळ्या, घागरचरवट, चिटकी, टिंबी, ठिल्या, डेरा, तवई, तवली, तवी, दुध्या, नांद, बुटकुलें, मडकी, मुंब, रांजण, सुगड.

**भाण.** (दाहा) नाटक, संप्रकरण, भाण, प्रहसन, डिम व्यायोग. समवाकार, वीथी. अंक, इहामृग.

**भाव.** विभाव, अनुभाव, व्याभिचारिभाव, सात्विकभाव, स्थायिभाव,

**भूत.** जा० असूर, पिशाच, राक्षस, आग्यावेताळ, चेडा, मोहन, रुद्रपिशाच, कर्णपिशाच, मारका, समा, खवीस, जिंद, चाळा, पुरूख, योगिणी, सोभणी, लांव, लास, दिवशी, जखीण, डंखीण, हडळ, हेडळी, असाळी, बळवंत, ब्रह्मराक्षस, बह्मपिशाच, महापुरुष, संबंध, मुंज्या, खवीस, तळखंबा, निर्वंशीकलम.

**भैरव.** (आठ) असितांग, रुरू, चंड, क्रोध, उन्मत्त, कुपति, भीषण, संहार.

**भोपळा.** जा० कोहळा, काशीभोपळा, देवडांगर, दुध्याभोपळा.

## म.

**मकारपंच.** मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा, मैथुन.

**मद.** आभिजात्यादिमद, धनमद, विद्यामद, स्वरूपमद, तारूण्यमद.

**मदन.** पहिलें मदन, आकणाचें मदन अ० दुसरें मदन, निकणाच मदन अ० तिसरें मदन. पाहिलीरास, दुसरें आकण, तिसरें निकण, चवथा मणी त्यास वलुताधणी.

**महापातकें.** पंचमहापातकें पाहा.

**महापीठ.** तुळजापूर, मातापूर, कोल्हापूर, सप्तशृंग.

**महारोग.** वातव्याधि, अश्मरी, कृछ, मेह, उद्धर, भगंदर, अर्श, संग्रहणी.

**मातृका.** (आठ) ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराहि, इंद्राणी, कौबेरीअ० चामुंडा, चर्चिका.

**मार्ग.** प्र० कर्म उपासना- ज्ञान- सिद्धांत- योग- वैराग्य मार्ग.

**मुद्रा.** गोचरी, अगोचरी, खेचरी, ज्ञान. २ खेचरी, भूचरी, चाचरी, अगोचरी, अलक्षी. ३ अंकुश मु० गरुड मु० घटा मु० धेनु मु० शंख मुद्रा.

**मृत्तिका.** प्र० अश्वमृतिका, गज- रथ- चतुष्पथ- गोष्ट- वल्मीक- न्हद- अथवा संगम मृत्तिका. २ गोष्ट- वेदिका- क्रितव- स्थान- न्हद, कर्षित- क्षेत्र- चतुष्पथ- स्मशान मृत्तिका.

## य.

**यम.** (आठ) यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि.

**यमक.** वर्ण- पद- लिंग- प्रकृति- प्रत्यय-भाषा- पदावययमक.

**यज्ञ.** प्र० ज्योतिष्टोम, राजसूयज्ञ, अश्वमेध, नरमेध, गोमेध, प्रातर्यज्ञ, वैश्वदेव. (य० संबंधी स्थलें, कर्मे, द्रव्यें इ०) यज्ञशाला, यज्ञमंडप, यज्ञपात्र, यज्ञपशु; दीक्षा, याजक, याजन, होमकुंड, हवनी, वेदी, होमाग्नि; यूप. (पशु बांधण्याचा खांब).

**योग.** (सत्ताविस) विष्कुंभ,प्रीति, आयुष्मान्, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मा, धृत, शुल्कल, गंड, वृद्धि, ध्रुव, व्याघात, हर्षण, वज्र, सिद्धि, व्यतीपात, वर्याण, परिघ, शीव, मृत्यु,सिद्धि, साध्य, शुभ, शुक्ल, ब्रह्मा, ऐंद्र, वैधृति.

**योगधर्म.** (दाहा) अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह, (यांस यम ह्मणतात) शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान, यांस नियम ह्मणतात). २ अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांति, अपैशुन, दया, अलोभ, मार्दव, लज्जा. ३ दम, क्षम, आचपल्य, तेज, तितिक्षा.

**युगें.** (चार) कृत, त्रेता, द्वापार, कलि.

**योनी.** मनुष्ययोनी, पशुयोनी, पक्षीयोनी, जलजीवयोनी, कीटकयोनी, वृक्षयोनी, धातुयोनि.

**योनिचतुष्टय.** जार, अंड, स्वेद, उद्भेद.

## र.

**रस.** शृंगार अथवा रति, उत्साह अ० हास्य, कारूण्य, रौद्र अ० क्रोध, विस्मय अ० अद्भुत, भय, बिभत्स, शांत, वात्सल्य.

**राग.** श्री, बसंत, भैरव, पंचम, मेघमल्हार, बृहनाट अ० नटनारायण. **श्लोक.** श्रीरागोथवसंतश्चभैरवः पंचमस्थतः ॥ मेघरागोब्रह्मनाटोषडैते पुरुषास्मृताः ॥-संगीत रत्नाकर ग्रंथ. २ म० **अस्ताई**— राग. बहिरव, बिलावर, विभास, खट, सारंग, गडिसारंग, कृष्णा, सारंग, मारवा, श्रीराग, शुद्धकल्याण, दीपकल्याण, यमनकल्याण-भूपकल्याण, हमीरकल्याण, कमोदकल्याण, विहंग, छायानाट, बीहाद, केदारा, कानडा, दरबारी कानडा, आडाणा, परद, कालिंगडा, देस, हिंडोल, बसंत, बहार. **अंत्रा**—रागिणी. रामकली, भैरवी, असावरी, गुणकली, तोडी, सुग्राई, मुलतानी, धनाश्री, पूर्याधनाश्री-पूर्वी, गौडी, काफी, बागेसरी, सोनी, धिंजोटी, नीलांबरी **आभोग** राग. माज, मल्हार, मघमल्हार, शामकल्याण, मालकंस, ललत, खमास, शंकराभरण.

**राघू.** जा० चंदन्या पोपट, टुया, धाम्या पोपट, नुरी, पहाडी पोपट, पाकचंदन, भावनगरी पोपट, रामनगरी पोपट, धामन, करटा.

**राजनीति.** प्र० आन्वीक्षिकी अ० तर्कविद्या, त्रयी अ० धर्मविद्या, वार्ता अ० अर्थविद्या, दंडनीति.

**राक्षसान्न.** बाजरी, उडीद, मसूर, राळा, मिरची.

**रुपया.** प्र० पन्हाळा, शाहपुरी रुपया, सुर्ती रुपाया, मिरजी, संभू.

**रेघ.** किंदरी, किताबती, खडे दुरकोनी, तिरकोनी, दफाती, बातेन, मसुदर अ० मशोदर, मदहर, शरायती, हरफ, हिकायती.

## ळ.

**लगाम.** प्र० उभा लगाम, करवती लगाम, कडोळी ल० कड्याचा ल० काट्या ल० काटेकडी ल० कुराड्या ल० सांकळी ल० सुतळ्या लगाम.

**लग्न.** (तत्संबंधी कार्ये) अरतवण परतवण, अक्षतारोपण, अंबा शिंवणें, आजेचोर, आतेचोर अ० आतेगौरव, अगठदाम, उडदामुहूत, ओहर करणी, कुरवंडी, गडकनेर, गांठदाम, गांठ सोडवण, गिन्हेपूजन ग्रहप्रवेश गोड जेवण, घटिकास्थापन, घाणा, दसवंदण, दिवाळसण, देवदर्शन, द्विरागमन, परतवण, पावण, पोट झांकणें, फलप्रधान, बोळवण, मांडवपरतणी, मासवंदन, मुहूर्तपूजा, रुखवत, लज्जाहोम, लक्ष्मीपूजन, सवेण्या, साडे, साखरपुडा, सुवर्णाभिषेक, सप्तपदी. —(लग्न कार्यास लागणारे पदार्थ) अहिरी, उष्टी हळद, ऐरिणी, औक्षवण, कंकण, कन्हा, कळसवणी, चौपासोडा, शेला, नक्षत्रमाळा, पाठ पासोडा, पालछत्र, पोटझांकणें, शेलामुदी, वही— (लग्नांतील माणसें, करवला, करवली, कानपिळ्या, मुरारी, पावण, पावता, वर) धावा, वन्हाडी. (ल० स० स्नानें) आठन्हाण, दसन्हाण, सोळन्हाण, मासन्हाण, रासन्हाण. (ल० सं० मान, देणगी इ०) आगव्याचा मान, अबोण, अष्टपुत्री, अष्टवायण, आखाडपाटी, आंचणी, जेष्ठासन, तळी, तिळवण, तेलफळ अ० तेलसाडी, दंपतिपूजन, दिंड, पडभोजन, पावण, मधुपर्क, मांडीचेपणें, लग्नसाडा, शिष्टाचार, श्रावणपाटी, सीमांतपूजन. —जानवसा, जानवसघर, दार ढवळणें, दार धरणें, मुहूर्तमेढ, मंडपमेढ, सुनमुख, वरघोडा, वरात, घरभरणी. लग्नचिटी-लग्नघाटिका, लग्नदीप, अंतःपट, ब्रह्मसूत्र, मांडवखंडणी, वाग्निश्चय, तांबूलश्रावणी मंगलसूत्र -प्रथमवर, बिजवर, पाठ, तिजवर.

**लिंगदेह.** (यांत) मन, बुद्धि, दशेंद्रिय आणि पंचप्राण राहतात.

**लुगडें.** प्र० सोनसळें, क्षिरोदक, जरतारी, कळसपाक, राजावळी, गुजरी, निसळ, चंद्रकळा, चवडी, गंगासागर, मुंगी, चिंचपान, शेलार, कलंदर, बोटधार, नामावळी, तगटी, ताडपत्र, मोतेचुरी, पातळ, कपिल, कल्हाई.

**लुप्तोपमा.** उपमान- उपमेय- धर्म- धर्मवाचक- धर्मोपमान- धर्मोपमेय- धर्मोपमान वाचक- धर्मोपमेय वाचक लुप्तोपमा.

**लोक. सप्तलोक** पाहा.

## व.

**वर्णचतुष्टय.** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र.

**वर्ष.** (नऊ) कुरू, हिरण्मय, रोमानक, इलावृत, हरी, केतुमाला, भाद्राश्वा, किन्नर, भरत.

**वस्त्र.** प्र० अनरस, अलिवा, किंवान, खंडकी, खादी, खारांव, खुतणी, खेंडा, खेंस, गंगाजमनी, गजनी, गर्भसुतकापड, गुजरी, गेट, घनवेल, चकला, चंद्रकळा, जामदानी, जोट, झोन्या, दोरवा, नावा, परकाळा, मशरू, माजरपाट, जगन्नाथी, रांवेरी, शालू, सुजनी, सुताडा, सुशी, हमलू.

**वसूल.** (संबंधीशब्द) सनदबाकी, तनखा, कमाविसदार, तळाठी, खोत, खेरीजजमा, ऐनजमा, भरवसूल, तरजमा, भरजमा, कमाल, महसुली, वसुल्या, सुट, जमाखर्च, काळीचावसुल, शिबंदी, पाहणी, पाहणीदार, पाहाणखरडा, जमाबंदी, बावनी, तसर, वरातदार, वसुली, भरवसुला, इनाम, इस्तावाव, कच्चीबाहिवाट, कमलावर्णे, खेरीजमक्ता, खोटवेरा, खोतखराबा, गांवनीसबत, चिल्हेर, झाडपट्टी, टकबंदी, तसर, तुसारपट्टी, तोटापट्टी, भरलावर्णे, मजरादास्त, सालबबंदी, सोस्ता.

**वाक्चतुष्टय.** परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी.

**वाक्यदोष.** [अलंकार शास्त्र] शब्दहीन, क्रम भ्रष्ट, विसंधि, पुनरुक्तिमत्, व्याकीर्ण, वाक्यसंकीर्ण, भिन्नलिंग, भिन्नवचन, न्यूनोपम,

अधिकोपम, भग्नछंद, विसर्गलुप्त, अस्थानसमास, वाच्यवर्जित, समाप्तपुनरात्त, संबंधवर्जित, पतत्प्रकर्ष, अधिकपद, अष्टार्धाधिबाहु, प्रक्रमभंग, अपूर्ण, वाक्यगर्भित, यतिभ्रष्ट, अशरीर, अरीतिक.—प्रताप रुद्र ग्रंथ. २ प्रतिकूल वर्ण, उपहतविसर्ग, लुप्तविसर्ग, विसंधि, हतवृत्त, न्यूनपद, अधिकपद, कथितपद, पतत्प्रकर्ष, समाप्तपुनरात्त, अर्धांतरैकवाचकपद, अभवन्मतयोग, अनभिहितवाच्य, अस्थानपद, अस्थानसमास, संकीर्ण, गर्भित, प्रसिद्धिहत, भग्नप्रक्रम, अक्रम, अमतपदार्थ--काव्यप्रकाश.

**वाच्यालंकार.** उपमालंकार, अनन्वय, उपमेयोपमा, प्रतीप, रूपक, परिणाम, उल्लेख, स्मृतिमान, भ्रांतिमान, ससंदेह, अपन्हुति, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति, तुल्ययोग्यता, दीपक, प्रतिवस्तूपमा, दृष्टांत, निदर्शना, व्यतिरेक, विनोक्ति, समासोक्ति, परिकर, परिकरांकुर, श्लेश, अप्रस्तुत प्रशंसा, प्रस्तुतांकुर, पर्यायोक्त, व्याजनिंदा, व्याजस्तुति, आक्षेप, विरोधाभास, विभावना, विशेषोक्ति, असंभव, असंगति, विषम, विचित्र, अधिक, अल्प, अन्योन्य, विशेष, व्याघात, कारणमाला, एकावली, मालादीपक, यथासंख्य, पर्याय, परिवृत्ति, विकल्प, समुच्चय, समाधि, प्रत्यनीक, काव्यार्थापत्ति, काव्यलिंग, अर्थांतरन्यास, विकस्वर, प्रौढोक्ति, संभावना, मिथ्याध्यवसिति, ललित, प्रहर्षण, विषादन, उल्लास, अवज्ञा, अनुज्ञा, लेश, मुद्रा, रत्नावली, तद्गुण, पूर्वरूप, अतद्गुण, उत्कर्ष, मीलित, सामान्य, उत्तर, चित्र, सूक्ष्म, व्याजोक्ति, विवृतोक्ति, लोकोक्ति, छेकोक्ति, वक्रोक्ति, स्वभावोक्ति, भाविक, अत्युक्ति, निरुक्ति, प्रतिषेध, विधि, हेतु, रसवत्, प्रेयस्, ऊर्जस्वित्, समाहित, भावोदय, भावसंधि, भावसबलता- प्रतापरुद्र ग्रंथ.

**वाद्यें.** प्र० अमृतकुंडली, करणा, करताल, किंगरी, किन्नरी, कोंका, गोमुख, खंजीरी, घुमट, घुमरी, चवघडा, चोटकें, छनार, जलतरंग, झंगड, झांज, टाळ, डफ, डांक, डंका, डोंर, ढोल, ढोलकी, तबला, तंबुरा, तंबुरी, ताशा, तुणतुणें, तुतारी, दंडी, दिंडो, धवशा, नगारा, नौबत, पखवाज, बीन, ब्रह्मविणा, भोंवारा, मंजिरी, मफो, मृदंग, रणहलगी, रुद्रविणा, विणा, सनई, संबळ, सरोदा, सांरगी, सारमंडळ, सुरसोटा, सूर.

**वायु.** प्र० उन्मत्तवायु, त्रिदोषवायु, धनुर्वायु, संधिवायु, ज्ञानवायु.

**वार.** आदित्यवार, सोमवार, मंगळवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार, शनिवार.

**वारा.** प्र० उगवतावारा, उत्तरवारा अ० उत्तराण, सानरस, उपर बाहेरचा वारा दक्षिणवारा अथवा डाकीण, चिल्या, हेटबाहेरचा वारा, मावळत वारा.

**व्याज.** प्र० अर्धोत्रा, एकोत्रा, दिढोत्रा, दुहोत्रा, तिहोत्रा, चहोत्रा, पंचोत्रा, साहोत्रा, सातोत्रा, आठोत्रा, नवोत्रा, दाहोत्रा आकोत्रा, बारोत्रा, विसोत्रा— सरळ व्याज, चक्रवाढ व्याज.

**विभूति.** (आठ) अणिमा, लघिमा, गरिमा, प्राप्ति, प्राकाम्य, महिमा, ईशता, वशिता.

**विवाहोत्सव.** (तत्संबंधी कार्ये) नवरीकडील— आरती, कन्याशुल्क, जाणवसा, जाणवसघर, देज, द्विरागमन, परतवण पाट पासोडा, पाठराख्या, पावण, पावता, भांगसळई, मंगळसूत्र, माघारपण, माघारी, माघारीण, मुहूर्तमणी, मुऱ्हाळी, मुऱ्हाळीपान, मूळ, लज्ञचुडा, लाह्यांचा मान, वधूप्रवेश, वधूवस्त्र, वेष, सुनमुख, हातपाणी, शुल्क, करवली, नवऱ्याकडील.— नवरदेव, जाणवसा, वरस्थान, वरबाप, मुंडावळ, अ० मंडावळी, वरधावा, वरमाय, सीमांतपूजन, वरपक्ष, वरदक्षिणा, लाडाचा तांब्या, भेटवकरा, वरघोडा, पाल, छत्र, वरात, घरभरणी, वरनिश्चित करणें करवला,

**विवेक.** (पांच) प्र० तत्वविवेक, पंचभूतविवेक, पंचकोशविवेक, मायाद्वैतविवेक, महावाक्यविवेक.

**विष.** (नऊप्र०) काकोल, कालकूट, हलाहल, सौराष्ट्रिक, शौक्तिकेय, ब्रह्मपुत्र, प्रदीपन, दारद, वत्सनाभ.

**विषयपंचक.** शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श.

**वीररस.** (चार) विद्या, युद्ध, दया, दान.

**वृत्ति.** (चार) कौशिकी, भारती, सात्वती, आरभटी.

**वृक्षराज.** वड, पिंपळ, आपटा, शमी, चोबचिनी.

**वेद.** ऋच, यजुस्, साम, अथर्व.

**वेदांग.** (साहा) शिक्षा, कल्प, व्याकरण, छंद, ज्योतिष, निरुक्ति.

**वेळा.** अमृत-उद्योग-काळ अ० मृत्यु- चंचळ अ० चौर-रोग-लाभ-शुभ- स्थिरवेळा. २ आंधळी वे०, घोर- घात-जाता येती- राक्षसवेळा,

**व्यभिचारिभाव.** (३२) निर्वेद, ग्लानि, शंका, असूया, मद, श्रम, आलस्य, दैन्य, चिंता, मोह, स्मृति, धृति, व्रीडा, चपलता, हर्ष, आवेश, जडता, गर्व, विषाद, औत्सुक्य, निद्रा, अपस्मार, शय, विबोध, अमर्ष, अवहित्था, उग्रता, मति, आपलंभ, व्याधि, उन्माद, मरण.

**व्यूहचतुष्टय.** दंड, भोग, मंडल, असंहत.

## श.

**शक्तित्रय.** प्रभुशक्ति, मंत्रशक्ति, उत्साहशक्ति.

**शपथ** (घेण्याचे प्रकार). देवावरचा बेल अ० फूल अ० तुळस काढणें अ० उचलणें, गाईचें शेपूट धरणें, ब्राह्मणाच्या पायावर हात ठेवणें, कढईंतून पैसा काढणें- रवा काढणें, गीता - गंगाजळी घेणें, माझीं लेकरेंबाळें मरोत ह्मणणें, मुलावर हात ठेवून बोलणें, अर्ध्यागंगेत उभाराहून बोलणें, भरल्या आढ्याखालीं बोलणें, अग्नीवर हात ठेवून बोलणें, गाईचा चारा डोक्यावर ठेवून बोलणें, बेलभंडार घेणें; रक्ताची आण, विद्यायिचाण, अन्नाची आण, देवाचीआण, तुमच्या पायांचीआण, कृष्णाबाईची आण, गळ्याचीआण, अन्नाची आण.

**शब्दगुण.** (चोवीस)श्लेष, प्रसाद, समता, माधुर्य, सुकुमारता, अर्थव्यक्ति, उदारत्व, कांति, उदात्तता, ओज, सुशब्दता, और्जित्य, विस्तर, समाधि, सौक्ष्म्य, गांभीर्य, प्रेय, सम्मितत्व, प्रौढि, रीति, उक्ति, गति, भावुक, संक्षेप—प्रतापरुद्रग्रंथ.

**शब्ददोष.** (तेरा)श्रुतिकटु, च्युतसंस्कृति, अप्रयुक्त, असमर्थ, निहतार्थ, अनुचितार्थ, निरर्थक, अवाचक, अश्लील. २ अप्रयुक्त, अपुष्टी असमर्थ, नेयार्थ, संदिग्ध, क्लिष्ट, गूढ, ग्राम्य, अन्यार्थ, अप्रतीतिक, अविमृष्ट, विधेयांश, विरुद्धमतिकृत, अश्लील, निरर्थक.

**शब्दालंकार.** वक्रोक्ति, अनुप्रास, यमक, श्लेष, पुनरुक्तवदाभास.

**शासन.** प्र० जेरबंद, चाबूक, वेताचा मार, दरेमार, तळवेमार, बंदिखाना, कोरडेमार, पारंब्याचामार, फोकाचामार, मोग्रेमार, बुदलेमार, ढगारणेंमार, बुक्या–गचंडी–गुढगेमार, शेणमार, दगडमार, लाता, तफराका कानखडे, टांगणें, टिपऱ्या, पिछोडे, बे-

डो, बुदनाल, कोलदांडा, नाकवणी, चुनवणी, रायवणी, जलाम-ध्यें बुचकळणें, हत्तीपुढें बांधून टाकणें, कर्णछेद, घ्राणछेद, जिव्हा-छेद, अधरछेद, हस्तछेद, पायछेद. तीरमार, सुळींदेणें, नेत्र-डो-ळे काढणें, नखोननखीं सुयामारणें, पारड्यामध्यें घालणें, कडेलोट क-णें, तोफेचें तोंडीं उडवणें, कानीं खुंट्या आदळणें, अपानीं मेखमारणें, खळग्यांत पुरणें, गळफास देणें, सांडस लावणें, शिसें पाजणें, शिर-छेद करणें, विष देणें.—दासबोध. द० ३.

**शुभचिन्हें.** (घोड्याचीं) खुंटेगाड, देवमण, पंचकल्याण, पद्म, रण-शूर, शामकर्ण, गोम, बाशिंग, गंगापाट, केरडोळे अ० जयमंगळ. कंठाभरण, कुशावर्त, सप्तदंती, वहालकांचन, बदकमुख, पर्वती, चिंतामणी, मेखलामुख, अष्टमंगळ, हयकंठी, अधोमुखीगोम.

**शेण.** प्र० रानशेण, माळशेण, गोवरी, वडी, थापा, थापटी, शेण-खंड.

**शेष.** रोगशेष, ऋणशेष, अग्निशेष, शत्रुशेष ठेऊंनये.

**श्राद्ध-** प्र० एकोद्दिष्टश्राद्ध, उदककुंभश्राद्ध, चौथभरणी, तिलतर्पण, तिलांजलि, दशपिंड, दौहित्र, धर्मपिंड, नांदीमुख, नांदीश्राद्ध, नित्यश्राद्ध, पार्वण, प्रीतिश्राद्ध, हिरण्यश्राद्ध, आमश्राद्ध, पाथेय श्राद्ध.

## ष.

**षट्कर्में.** (ब्राम्हणाचीं) अध्ययन, दान, याजन, अध्यापन, प्र-तिग्रह, यजन. २ जारण, मारण, उच्चाटण, मोहन, स्तंभन, विध्वंसन. ३ कणवृत्ति, प्रतिग्रह, याचना, कृषि, वाणिज्यवृत्ति, गोरक्ष, वा-टक्षकवृत्ति (म्हणजे, दाणेंटिपणें, दानघेणें, भिक्षा मागणें, शेत क-रणें, व्यापार करणें, गाई राखणें व्याजबट्टा करणें, हीं कामें ब्राह्मणानें उपजीविकेकरितां करावीं.)

**षट्चक्रभेद.** मलाधारचक्र (स्थान—लिंग आणि नाभि.) ;लिंगच-क्र (स्था० लिंग) ; नाभिचक्र (स्था० नाभि) हृत्चक्र (स्था० हृदय), कंठचक्र (स्था० कंठ) ; मूर्द्धचक्र (मूर्द्ध).

**षट्शास्त्रें.** न्याय, वैशेषिक, मीमांसा, वेदांत, सांख्य, पातंजल.

**षडंग.** दोनबाहू, दोन पाय, मस्तक, कटी. २ व्याकरण, छंद

ज्योतिष, निरुक्ति, कल्पसूत्र, शिक्षा (हीं वेदाचीं अंगें होत.)

**षडक्षर.** कां, हीं, ये, त, ना, हीं,

**षड्गुण.** समग्र ऐश्वर्य, स० धर्म, स० यश, स० श्री, स० ज्ञान, स० वैराग्य. २ (राजनीतीचे प्रकार) संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव, समाश्रय.

**षड्दर्शनें. षट्शास्त्रें** पाहा.

**षड्विकार.** अस्तित्व, वर्त्तन, वृद्धि, परिणाम, ह्रास— नाश (प्राकृत) असणें, होणें वाढणें, परिणाम पावणें.

**षड्रस.** गोड, अंबट, खारट, तिखट, तुरट, कडु.

**षड्रिपु.** काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर.

**षोडशपदार्थ.** प्रमाण, प्रमेय, संशय, प्रयोजन, दृष्टंत, सिद्धांत अवयव, तर्क, निर्णय, वाद, जल्प, वितंडा, हेत्वाभास, छल, जाति, निग्रहस्थान.

**षोडशमहादानें.** तुलापुरुष, हिरण्यगर्भ, ब्रह्मांड, कल्पवृक्ष, गोसहस्त्र, हिरण्य, कामधेनु, हिरण्याश्व, हिरण्याश्वरथ, पंचलंगलक, धरा, विश्वचक्र, कल्पलता, सप्तसागर, रत्नधेनु, महाभूतघट.

**षोडशसंस्कार. संस्कार.** पाहा.

**षोडशोपचार.** आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नवैद्य, दक्षिणा, प्रदक्षिणा, मंत्रपुष्प.

## स.

**सण.** अदुःखनवमी अ० अयोनवमी, अविधवानवमी, अहेवनवमी अक्षयतृतीया, ऋषिपंचमी, कपिलाषष्ठी, करष्टमी, कालाष्टक-कालाष्टमी, कोजागरी पूर्णिमा, गजछाया, गुढीपाडवा, गोकुळाष्टमी, गौरीतृतीया, घातचतुर्दशी, घायाळ चतुर्दशी, चंपाषष्ठी-चंपाष्टमी, चुडीपुनव, चौथभरणी, जन्माष्टमी, टवळीअंवस, तुलशीविवाह, त्रिपुरीपुनव, त्रिपुरोत्सव, दत्तात्रयजयंती, दंवणीपुन-

व, दशरथललिता, दशाहरा, दसरा, दांडेपूर्णिमा, दिवई, दि वाळी, दिव्याची अमावास्या, धनतेरस, धर्मराजाची बीज, न- रसिंहजयंती, नवरात्र, नवान्नपूर्णिमा, अ० नव्याची पुनव, नरकचतुर्दशी, नागदिवाळी, नागपंचमी, नारळी पौर्णिमा, परिवर्तनी, पवित्रीपूर्णि- मा, पिठोरी, पोवतीपूर्णिमा, पोळा, प्रबोधिनी, प्रबोधोत्सव, बहीण- बीज अ० तीज, बेंदूर, भरणीचौथ, भाऊबीज, भानुसप्तमी, म- करसंक्रमण, मत्स्यजयंती, महानवमी, महाष्टमी, महाशिवरात्र, र- थोत्सव, रंगपंचमी, रामजयंती, रामनवमी, ललितापंचमी, व- त्सद्वादशी अ० वागबारस अ० वसुबारस, वडपुनव, वसंतपंचमी, वांझीपुनव, विजयादशमी, वेळअंवस, वैकुंठचतुर्दशी, शयनी, शा- रदीयनवरात्र, शिमगा, शिवरात्र, शिळासप्तमी, सोमवती, हरि- तालिका, होळीपुनव.

**सप्तऋषि.** कश्यप, आत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, वसिष्ठ. २ मरीचि, अत्रि, आंगिरस, पुलस्ति, पुलह, क्रतु, व- सिष्ठ.

**सप्तद्वीप.** जंबु, कुश, प्लक्ष, शाल्मली, क्रौंच, शाक, पुष्कर.

**सप्तधातु** रस, रक्त, मांस, मेद, मज्जा, अस्थि, शुक्र. २ सु- वर्ण, रजत, ताम्र, वंग, नाग, तीक्ष्णक, कांस्य.

**सप्तनद.** शोणभद्र, सिंधु, हिरण्यवाह, कोक, घर्घर, लोहित, शतद्रु.

**सप्तपर्वत.** महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, गंधमादन, विंध्य, पारियात्र,

**श्लोक.** महेंद्रोमलयःसह्यःशुक्तिमान्गंधमादनः ॥ विंध्यश्चपारियात्र- श्चसप्तैतेकुलपर्वताः ॥

**सप्तपाताल.** अतल, वितल, सुतल, महातल, रसातल, तलातल, पाताल.

**सप्तलोक.** भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, त- पोलोक, सत्यलोक.

**सप्तविधाप्रकृति.** स्वामी, अमात्य, सुहृत्, कोश, राष्ट्र, दुर्ग, बल.

**सप्तसमुद्र.** क्षारोद, इक्षुरसोद, सुरोद, घृतोद, दधिमंडोद, शु- द्धोद, क्षीरोद.

**सप्तस्कंध.** आवह, प्रवा, उद्वह, सह, वैव, धठापरा, परीवाहा

**सप्तस्वर.** सा, रि, ग म, प, ध, नि - निषाध, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत, पंचम.

**सप्तहरीतकी.** (जा०) विजया, रोहिणी, पूतना, अमृता, चेतकी, अभया, जिवंती. २ अभया, चेतकी, पथ्या, पूतना, हरीतकी, जया, हैमावती.

**सप्तक्षार.** तिल, अपामार्ग, करंज, पलाश, अर्क, यव, चिंचा.

**सप्तोपचार.** पाचन, रेचन, छेदन, शमन, मोहन, स्तंभन, वर्द्धन.

**समुद्रचतुष्टय.** पूर्व- पश्चिम- उत्तर- दक्षिणसमुद्र.

**सरकारदेणें.** प्र० झाडपट्टी, निमसारा, उंबरसारा, फाळा, विहिरहुडा, तुसारापट्टी, संतोषपट्टी, जकात, पाटदाम, सारा, सादिलवारपट्टी, तोटापट्टी, अडाणपट्टी.

**संस्कार.** (पुरुषाचे.) गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, विष्णुबलि, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, सूर्यावलोकन, अन्नप्राशन, चूडाकार्य, उपनयन, महानाम्य, समावर्त्तन, विवाह, स्वर्गारोहण.

**संक्षेपन.** प्र० आ म्हणजे अझजम, अवदें, इा –इसवी; इस्तकबीड्ज खा.. खुदावंद; गंा..गंगाभागीर्थी; गुा.. गुजारत, गुदस्त गुमास्ता; चिा..चिरंजीव; छ 2 नोंप४ चंद्र; ता..तारीख, ताजाकलम, तरफ, ताहां; तीा.. तीर्थरूप, तीर्थस्वरूप- दाा ..दस्तूर, दस्कत; दिा ..दिम्मत; निा ..निसबत, पा .. परगणा, पाटील, पाठविला; पोा .. पोष्य; प्राा .. प्रांत, प्रविष्ट; प्रो .. प्रमाणे; बा .. बदल, बरहुकूम; बो ा.; बेहिम; बिा .. बिकलम; बुा .. बुद्रूक; मा .. मश्रूल. मोहबत; मा .. मशारनिल्हे, माहे; माा ..मजकूर, मिा .. मिती; मुा ..मुक्काम; रा .. राजेश्री, रवाना; रुा ..रुजू, रूपये; वा .. वस्ती, वलद, वद्य; विा .. विशेष, विनंति; वो .. वेदमुर्ती; शा शास्त्री; शो ा.. शके; शु ा..

शुद्ध , श्री. · स्नेहांकित; सु॥ . . सुरसन्न, सौ . . सौभाग्यवती. ह॥ . . हस्ताक्षर, हा . . हस्तें; हे॥ . . हेंचपत्रीं.

**साकर.** जा० खांड, गुळी, चिनी, दाणा, दुबोटा, नाबदसाखर, फुलगोटा, बुरासाखर, मुगदुमोसाखर, रायपुरी सा०, खडीसाखर, धुवासाखर, पिठीसाखर, बनारशीसाखर.

**साडेतीनपोशाख.** पागोटें, शालजोडी कि० शेला, (पायजामा अ० झगाकरायास) महामुद्रा, (अर्धातुकडा किनखापाचा) पटका.

**साडेतीनमुहूर्त.** दसरा, दिवाळीचा प्रतिपदा, वर्षप्रतिपदा, नागपंचमी.

**साडेतीनशाहणे.** सखाराम बापू, विठ्ठल सुंदर, विठ्ठल देवजी, (अर्धाशा०) नानाफडनवीस. (सख्या, विठ्या, देव्या.)

**साधनचतुष्टय.** वस्तुविवेक, वैराग्य, शमादि (ह्मणजे शम, दम, दया, तितिक्षा, उपरति, समाधान), मुमुक्षुत्व—नित्यानित्य वस्तु विवेक॥ इहामूत्र फल भोग विराग॥ शमादि षट् संपत्ति॥ मुमुक्षुत्वं॥

**सुपारी.** जा० ओलीसु० कच्चीसुपारी अ० पांढरी अ० रोठीसु०, दगडीसु० फुलबरडीसु० लवंगचुनिसु०

**साप.** आगीमण्यार, आग्याघणस, आगेंफुरसें, कवड्याघणस, कवड्यासर्प, कांडार, कामळ्या, कुसडाघणस, घणस, चाकण, जोगी, डुरडुरा, डोंब्यानाग, तक्षक, धामण्या, नाग, नांदेटा, फुरसें, मणेर, मण्यासाप, महांडूळ अ० मालुंड.

**सेनांग.** हस्ति, रथ, अश्व, पदाति.

**सोयरेधायरे** इ० व्याही, विहीण, साडू, नणंद, दीर, भावा, जाऊ, भाउजयी, आजेसासरा, आजेसासू, पणजेसा०, पणजोसा० चुलतसा० चुलतआजा, चुलतआजी, चुलतचुलता, चुलतचुलती, चुलत चुलतभाऊ; चुलत चुलत भाउजई, चु० चु० बहिण, चु० चु० मेहुणा, चुलत मामा, चु० मामी, मावशी, चु० चु० दीर. चुलत नणंद, चुल० जाऊ, चु० चु० जाऊ, चु० चु० नणंद, चुलत, भाउजई, मामे सासरा, मा०सासु, मा० जाऊ, मा० दीर, मामे नणंद, मा० भाउजयी, मा० मेहुणा, मेहवणी, मावस सासु, मा० सासरा, मावस आजा, मा० आजी, मा० दी-

र, मा० जाऊ, मा० नणंद, मावस भाउजई, मा० मेहुणा, मा० मेहुणी, आते, सासु, आ० सासरा, आ० दीर, आ० जाऊ, आतेनणंद, आ० भाऊजई, आतेमेहुणा, आ० मेहुणी—सावत्रभाई, सावत्र मावसी इत्यादिक.

**सोळासंस्कार.** संस्कार पाहा.

**सोळासूक्ष्मभूतें.** पंचतन्मात्रें, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, मन.

**संख्या.** एकं, दहं, शतं, सहस्र, लक्ष, दशलक्ष, कोटि, दशकोटी, अब्ज अ० अरबुद, खर्व, निखर्व, पद्म, शंकु, जलधि, अंत्य, मध्य, परार्ध.

**स्कंध.** (तीन) गणितस्कंध, होरास्कंध, संहितास्कंध.

**स्त्रीधन.** अध्यग्नि, अध्यावहनिक, आधिवेदनिक, प्रीतिदत्त, शुल्क-अन्वाधेय.

**स्थायीभाव.** (आठ) रति, हास, शोक, उत्साह, क्रोध, भय, निर्वेद, विस्मय.

**स्थिति.** (तीन) उत्पत्ति, स्थिति, लय.

**स्नान.** (प्र०) अंगस्नान, शिरस्नान, कटिस्नान, कंठस्नान, पादप्रक्षालन, मुखप्रक्षालन, प्रातःस्नान, तीर्थस्नान, समुद्रस्नान, अभ्यंगस्नान, नाहाण, मानसस्नान, मृत्तिकास्नान, गोमयस्नान, मंत्रस्नान, भस्मस्नान, गणस्नान.—भुडभुडगंगा, दंडस्नान, मुसळस्नान शास्त्रासस्नान, शुपटस्नान, नावासस्नान, ह्मणायास स्नान.

## ह.

**हिशेब.** प्र० व० अज, अडांख, एकुणात, दुकारी, बीत, वासलात-हिशेब, कितेब.—अडावा, सदरघडणी, रूमाल, हातरूमाल- चालताहिशेब, जमाखर्च, कच्चा हिशेब, एकबेरजी- उधार, खातेवाईक, शिलक झाडाकरणें, खातेबाकी काढणें, झाडाझडती घेणें, झाडाझडती करणें, फारीक- दफेरफे करणें, बाकीपूड्य करणें, वजावटफडशा करणें, नांवावर- नांवीं लिहिणें- मांडणें, खातीं लिहिणें- मांडणें- धरणें.

**हुद्देदार.** प्र० कमावीसदार, कोठनीस, कोठीवाला, खजीनदार, खाजगीवाला, चीटनीस, जमनीस, जामीननीस, जामदार, टीपनीस, टीपकर, ठाणेदार, तगादेदार, तगादगीर, तजकरनीस, तपासनीस, तरजूमान, तरफदार, तळाठी, दफतदार, दफतरनीस, दबीर, देशकुळकरणी, देशमूख, देशपांड्या, देसाई, पोतदार, पोतनीस, फडनीस, फारसनीस, बारनीस, महालकरी, मजूमदार, मामलतदार, मुद्राधरी, वाकनीस, शीक्केनीस, शिक्केबरदार, शेखदार, सबनीस, सभासद, सरकमावीसदार, सरकानूनगो, सरदेशमुख, सरदेशपांड्या, सरसूभेदार, सूरनीस, हवालदार, हस्मनवीस, हशमफड, नवीस, हजीरनवीस,

**हुंडी.** प्र० रोकडहुंडी, पेंठ, शाहजोग हुंडी, खोका, लहणीहूंडी-लगतहुंडी-सकार; नकाराई अ० नकराई. नकार; हुंडणावळ, हुंडी लावणें. धनीजोगहुं०

**होन.** शिवराईहोन– पादशाहीहोन, सणगिरीहोन, रामराई-देवराई-जडमाळी-धारवडी – कावरी, शैल्यघाटी–पानायकी– अदवानी– ताडपत्री –निशाणी, हुकेरी सोंपे – अच्युतराई– एकेरीहोन.

## क्ष.

**क्षीरवृक्ष.** वड, रुई, सावरी, चांपा, उंबर शेर, इत्यादिक

# भाग दुसरा.

**अकराल.** अकटोविकट, विकराळ, अघोर, भयंकर, भयानक, विकट, दिकराल, कराला, भैरव, दारुण, उग्र, रौद्र, भयावह, भयकारक, भयजनक, भेसुर, भ्यासुर, त्रासकारक, भयजनक, भीषण, भीम.

**अग्नि.** आग, विस्तव, वीस्तू, अनल, जमदग्नि; होमाग्नि, गृहाग्नि — खेत लोळ, गळूल, — वडवाग्नि, वडवानल, कल्लोळ, भडाका, धगाटा, धोदसट, धोकाळ.

**अपमान.** बदरंग, बेरंग, बदबोर, अप्रतिष्ठा, अपयश; पाणउतारा, बदलौकिक, बदनाम, बदनामी, तेजोभंग, तेजोन्हास, मान-

भंग, मानहानि, च्यूति, परीभव- फजिती, फटफजिती, हस थूथू, छीथू, धूळ, धूळदशा, धूळमासा, धूळधाणी, धूळधान, धूळधूळ, धुळपट, धळपट्टी, पट्टाधूळ, झील, बचेरी, भंबेरी, रेवडी भंडवा, भुरली, राळ, विट्ट, उलटी पूजा, बदनकशा, वदशान, भगल, टपली, भंड, शेणमार, फत्तर पूजा, खेटरपूजा, फेरघोंगडें, हुररेवडी, हुर्र वावडी, हुरली, वखबख, भवाडा, विटंबना, शोभा, नाकाटी, नाचक्की.

**अपार.** अनंत, अनंतपार, अपरंपार, निरवधी, असीम, निसीम, अमर्याद, आनियात्तक—अगाध, अनिवार, निमर्याद, अवारपार, दुरत, अतिशईत, पराकाष्टेचा, अपरिमीत, अमित, आपरमीय, अप्रमये, असंख्य, अगणनीय, अगण्य, अगणित, बेसूमार, बसूमाराचो, बेहद्द, अशेष.

**अभ्यासी.** विद्येचा- अध्ययनाचा- पढण्याचा आस्थेवाईक- छंदी, अध्ययनी, अध्ययनशील- परायण- पर- आसक्त- तत्पर, विद्याभ्यासी, विद्यापरायण, विद्याव्यासंगी, विद्येच्छु, विद्याव्यसनी, अध्यायनाभिमुख, जिज्ञासु.

**अभिलाष करणें.** खाणें, गिळणें, ग्रासणें, चावणें, हरामखोरी- तनाखोरी- खग्रास- चापसाचापसी- खाद करणें, खादगीखाणें- दपटणें, जिरवणें, तुरवणें, गटकावणें, पचवणें, चापचणें, हबकणें, गिळंत- गप- गडगप- गलगप- गट- गरक- उरीमुरीकरणें, दमदेणें-मारणें, गळ्याखालीं उतरून देणें, गोळाबेरीज, काळापात करणें, खाऊनचकंदळ करणें, खाऊनपाठे करणें, गिळंकृत करणें, खाड्यांत उतरणें, तावदेणें, धडांत टाकणें, आप्यायन- भानगड करणें.

**अलंकार.** भूषण, वस्त, डागिना, दागिना, नग, नगोटें, आभरण.

**अव्यवस्था.** घालमेल, गोंधळ, घोळ, घप्पाघोळ, घोळंकार, गदळ, गाबाळ, गव्हाटा, गफलत, गडबड, गलबल, गलफठ, घोटाळा, गुरफटा, गोबळगाथा, गाबाळगाथा, संकर, ब्रह्मघोळ, विस्कळ, अफरातफर, गलत, गलतान, खबल, एकचाट, एकमंगळ, गाळण, एकाकार, दपलंशाई, बचमंगळ, भिसामिळा, झिंगड, भानगड, बचबच, बवचव, खवदव, दवदव, दवळादळ, बचदव, धांदल, गडबडमुंडा, धांदलफटी, धांदलाधांदल, गुघाण.

भा० सं० तेथें वेड्याचा बाजार पिकला आहे.

**अवरठा.** निबा, ब्रह्मचारी, निसंग. भा० सं० मसणखुंट, ओणव्यातला-खुंट, खुंटारा, सोट, सेडसोट, सडशिंग, सोटशिंग, सडाफटिंग, सडेहुपट, खुंटावरचा कावळा, थोटापिंपळ, पारोंपिपळ, वडापिंपळ, फटिंगभाई, उपटसुंभा, पिंपळावरचा मुंज्या, जन्मसन्यासी, जन्मबद्ध, एकटा टिकोजी, एकटा एकसुरा, फकीर, सोटभैरव, ओठाश्रमी. भा० सं० घरनादार आणि देवळीं बिऱ्हाड. नदीवर न्हाण गावांत भिक आणि देवळीं निद्रा. त्याचें बिऱ्हाडबाजलें ब-रोबरच.

**अवळून बांधणें.** ताणणें, ताणून धरणें- बांधणें, ओढून धर-णें, अवटरणें, खचणें, चढवणें, सन्निबंधन करणें, जवकणें, जख-डणें, जखडून बांधणें, जेठणें, करकचणें, करकचून बांधणें, क-रकचून अवळणें, कचकावणें, तकटणें, तकटून बांधणें, तंगडणें, तंगे-डणें, अक्रसणें, भिडवणें, चौखरून बांधणें.

**अशक्त.** दुर्बल, शक्तिहीन, दुबळा, कमजोर, निजोर, कमकुवत, कमतणूक, नबला, अबल, लुकसान, स्वल्पबल, अल्पबल, बलन्यू-न, न्यूनबल.

**अशाश्वत.** दोन दिवसांचा, चार दिवसांचा, महिनापंधरा दि-वसांचा, थोड्याकाळाचा, आठवडेपाईक, येताजाता, आलागेला, उ-डलटप्पू, चालीवजा, हंगामी, अचिर, अचिरस्थाई, अचिरकाल-स्थाई, अचिरकालिक, अल्पकालिक, अस्थाई—अनित्य, चंचल-क्षणीक, क्षणभंगुर, उत्पन्नविनाशी.

**आई.** माता, माय, अंबा, जननी, मातृ, मातोश्री, मावली, मा-य, माउली.

**आकळणें.** आवरणें, राहविणें, थांबविणें, आटपणें, सावरणें, बं-दांत—आळ्यांत—दाबांत—आटणींत ठेवणें—राखणें, बांधणें, अटकेंत घालणें, लगामीं धरणें, अरिखणें, आळा बांधणें, दडपणें, दावणें. आडकाठी घालणें, आवरण — निरोध — निग्रह—नियमन करणें.

**आकार.** आकृति, घडण, घडणी, घडवण, बांधा, घाट, घडीत-डौल, उभारणी, रूप, छब, बेत, वळण, विध — तोंड, मोड, ठेव, ठेवण, घटाव, बांधावळ, बांधणें, भट्टी, मासला — चंद्राकार-

अंडाकार, मंडलाकार, वृत्ताकार, वलयाकार, गोलाकार, कुंभाकार, पर्णाकार, ग्रहाकार, वृक्षाकार.

**आकाशगंगा.** आकाशनदी, देवनदी, सुरनदी, स्वर्गंगा, स्वर्नदी, मंदाकिनी, वियद्गंगा, स्वर्धुनी.

**आक्रोशकरणें.** रडणें, ओरडणें, आकांत करणें, दळ — दळाला — भळभळ — भळभळां — खळखळ — घळघळ — टचटचून रडणें, उचाचून पाणीडोळ्यांत येणें, गाया पाण्यावर - नदीवर आणणें — उक्शा बुक्शी रडणें, चळ घेणें, चेकळणें, रडण्याचीटक लावणें, रडण्याचा टाहो — लाहो घेणें, रडून आकांत — अनर्थ - दंगा करणें, रड - रडेघेणें — मांडणें — लावणें — उमसणें, स्फुंदणें, हुंदके घेऊन — काढून — उमासे येऊन — उमाडे काढून रडणें —(मुलाचें) केंकणें, व्याहा व्याहा — टेंटें — रडुंरडुं करणें, कोंकलणें, किरकरणें-पिरंगणें, कूसमुसणें, फुसफुस करणें, किर्किरणें, पिरपिरणें, मिणमिणणें, पिडपटण, कन्हेरीगाणें, टाहोकरणें. —(जनावराचें) आरडणें, पुकारणें, बोहणें, शब्द करणें, किकळणें, किकळी फोडणें, रेराणकरणें, भोंकणें, म्याउ म्याउ करणें, हिसणें, गर्जन करणें, डुरकी फोडणें, टुडुकरणें, चूचकरणें, चूळचूक करणें, हूक घालणें; शेवळ घालणें —(पक्ष्यांचें) किलबिलणें, आरवणें, किरकरणें.

**आतां.** एव्हां, आतांशी, हल्लीं, हालीं, हाल, सांप्रत, सांप्रतकाळीं, यावेळीं, यावेळेस, प्रस्तुत, आजकाल, आजकाल्लीं, वर्तमानकाळीं तूर्त, तूर्तकाळीं, सद्या, सध्यस्कालीं, सध्याकाळीं, इदानीम्, प्रस्तुत, अथ, संप्रति, अधुना, एषवा.

**आत्मा.** परमात्मा, सच्चिदांश, चित्कला, चिदाभास, त्वंपदार्थ, अंतर्याम, अंतर्यामी २ जीवात्मा, प्राणात्मा, प्राण, जीव, चैतन्य, आत्माराम, क्षेत्रज्ञ, चिदाभास, चित्कला, चैतन्यकारण, जीवनकला, पुरुष.

**आनंद.** हर्ष, हर्ख, संतोष, उल्लास, उत्साह, खुशी, आल्हाद, मल्हाद, प्रमोद, परितोष, आनंदवृत्ति — अत्यानंद, परमानंद, महानंद, अतिहर्ष, रोमांच, बालोबालखुशी, बालोबालसुख, रोमहर्ष, हर्षावेश.

**आयास करणें.** झटणें, कुंथणें, उद्योग — यत्न — प्रयत्न — प्रयास, करणें, मेहनत — श्रम — कष्ट घेणें — करणें — झटणें, बळक-रणें, अगाध वळवाहणें, अळें वळें झटणें, जोरमारणें, ऊरफोडणें, दांतीबळधरणें, अनर्थ मांडणें, भगीरथ प्रयत्न करणें, सातसायास करणें, वेणा — खिडका देणें, जीव देणें — टाकणें — अर्धांकरणें, दंडपेलणें, एकगजब करणें — मांडणें, घोरकार करणें, ऊरफोड क-रणें, कडाकुट, लोंबीझोंबी — वाटाघाट — अट्टाहस — करणें, हाडें झिजवणें, हाडांचें पाडें करणें, हाडांचे मणी करणें.

**आर्जवी.** आर्जवु, आर्जवाचा, मन धरणीचा, खुशामती, खुशा-मत्या, तोंडाकडे पाहणारा, तोंडदेख्या, तोंडासारखें बोलणारा, डोळे पाहून वागणारा, मर्जीचा कल पाहून वर्त्तणारा, जीजी म्हणणारा, तोंड-चाट्या, थुंकी झेलणारा, तोंडपूजा, छंदानुरोधी, वशवर्ती.

**आलिंगणें.** कवटाळणें, कवटाळणें, वेंगणें, वेंगटणें, वेंगाटणें, कवें-त — गवेंत धरणें, उराशीं - पोटाशीं धरणें, उरीं पोटीं धरणें, कव - गव - मिठी - विळखा घालणें, वेंग - मिठी मारणें, खेमदेणें, आलिंगन करणें - घेणें - देणें, कंवटाळणी करणें.

**आवरण.** आकलन आवर, अडप दडप, दाब, निरोध, निवारण, निग्रहण, निर्बंधन, नियमन, संयमन, संयम, यमन, यम, यंत्रण, नि-यन्त्रण, यंत्र — अटोप, अटक, आटणी, दाब, निग्रह, अवरोध, उ-परोध, निर्बंध, सग्रह, आडकाठी, आड्या बाधा, मर्यादा, पडदा, कैद, लगाम.

**आसन.** ठाण, अंगठान, ठाणमान, बैठक, अंगस्थिति, अंगसंस्थिति, अंगविन्यास, शरीरस्थिति, शरीरविन्यास, शरीरसंस्था.

**आळशाचा मायबाप.** शताळशी, अचळोजी, अचळोबा, अजग-र, आर, रीस, ऐदी, शनि, पेंदपोहो, लोणसकड, थापा, मोभळ्, झ-सोबा, झशा, उठवळ, हल्या - भा० सं० उंटावरून शेळ्या वळणारा, पिकल्या झाडाखालीं उपाशीं मरणारा, काठीनें पाणी शिवणारा, का-ठीनें संध्या करणारा

**आळशी.** आळसट, आळसडा, सुस्त, ढिला, जड, पड्या, मंद, मैं-द, मट्ट, मठ्या, घेश्या, वेम, वठ्ठ, लिगडा, अनुद्योगी, निरुद्योगी,

कामचुकाऊ, अंगजड, शिथिल, निरुत्साह, उद्योगद्वेष्टा, उद्योगशत्रु, कार्यानुत्साही.

**आज्ञा.** आदेश, शासन, हुकूम, विधान, विधि, कल्या, निदेश, निर्देश, नियोग — फरमास, अनुज्ञा.

## क.

**कचाट.** दुःख, संकट, संकष्ट, कातर, पेच, पेंचाटी, कच, लचांड, ओंकटें, खेंकटें, कोंडें, झेंगट, लफडें, कुलंगडें, घोरपड, गडखळ, गड, काबीज, चक्र, गंडांत, गंडांतर, संक्रांत, बाजू, समय, उपाधि, व्याध, फेरा, कष्ट, जंजाळ, झोंबट, झट, अनिष्ट, अनिष्टापात, अनिष्ट, अभद्र, अशुभ, विपत्ती, आपदा, काळ, गजब, आपत, विपदा, काळकंटक — अनर्थापात, आकांत, गजब, कहर, उल्कापात, उल्बण.

**कटकट.** धडाधडी, कडकडी, घासाघीस, घसमस, तडकाफडकी, खणका, दणका, खडका, थडका, तकमक, कलकल, किलकील, किलकिलाट, किलबील, किलबिलाट, कचक, कचाकच, कच, खळखळ, झमाझमी, फटकाफटकी, कलागत, बाचाबाच, कडकडणें, कलह, करकर, रसकस, धसफस, धुसफुस, धसाफसी, झोटधरणी, कटाकड्या, कट्टेमांडण, झांज, महारकचका, कळवंडा, कळवंडो, हर्षामर्ष.

**कण.** कणी, कणू, कणिका, लव, लेश, कला, किणकिणी. भा० सं० सुपारीचें खांड, सुईच्या शेंड्यावरची माती, नखभरमाती.

**कपट.** कृत्रीम, मया, मात्र, कापट्य, छद्म, कैतव, प्रपंच, छल, मिष, मीस, दगळ, दगलबाजी, दगा, दगाबाजी, ठकबाजी, भगल, चेटक, यकर, चकर मकर, छल, व्याज, कूट, दुर्धौर्त्य, कपटविद्या, ठकबाजी — माया, मात्र, फसवण, नागवणूक, हुल्कावणी. भा० सं० मावेचेंमथन, आणथुक्याचेंकाजळ, धंदराधंदरीचा (व्यापार), भूतसृष्टि, ऐंद्रजाल, दाखवणूक, माकडसेंडा.

**कपाळकरंटा.** दैवाचाभोपळा, आकाबाईचाबंधु - भाऊ - वडीलभाऊ, आकाबाईचेंकूळ, फुटक्यादैवाचा, फुटक्याकपाळाचा, कपाळफुटका, अष्टकपाळ्या, हाडकपाळ्या, भद्रकपाळाचा, भद्या, रवळनाथाचेंकळ, शंख्या, बळभद्र, हतभाग्य, काजळतोंड्या, काळतोंड्या, बोंबोलभि-

क्या, पांढरेपायांचा, खुरंटपायाचा, अपेशी, फत्तेलस्कर, कमबख्त, हलाख, जगत्सेट, घरनादार आणि देवळींबिऱ्हाड, खैशा, जन्मकरंटा, खापरतोंड्या, करंटा, दलभंजन, रंक, खरखर मुंडा, भणंगभिकारी, पालथाजन्मला, उताणापडलेला, धाले धन्याचालिंक, विचारा, लाचार, दग्धहस्त, दग्धहस्ती, निखोरडा, शुद्धस्फटिक, शुद्धबुद्ध.

**कपाळफुटका.** हीनभाग्य, अभागी, अपेशी, खापरतोंड्या, उणेदैवाचा, निर्दैव, दुर्दैव, दैवोपहत, मंदभाग्य, हतभाग्य.

**कबाडकष्ट.** मशागत, कसाब्त, कसाला, महारकष्ट, कुनेपशी, आयास, सायास, प्रयास, अट्टाहास, अटाआट, अटाघाट, अटाविटा, अटापिटी, अटापीट, वाटाघाट, कडाकूट, कपाळकूट, माथाकूट, कपाळफोड, माथेफोड, डोईफोड, ऊरफोड, उपद्व्याप, खटपट, दगदग, खवदव, धकाधक, यातायात, वणवण, खस्ता.

**करडा.** सखत, कडक, खरमऱ्या, कदरखोर, कैखोरे, कैदी, कठोर, कठीण, तिखट, प्रखर, कहरी, निष्ठुर, उग्रदंड, उग्रशासन, दंडनशील, भैरवशासन, दंडबुद्धि, उद्यतदंड, उद्यतबाहू, जाली, खपाड्या, निर्वाण, कणक्या. भा० सं० तरवारीच्या धारेवर वागविणारा करवतीवर वागवणारा.

**करनकर.** करनकऱ्या, चकरनकर, अकरताळा, अगस्तामा, हेकट, हेगड, हेकेखोर, हटखोर, वेडावाकडा, हेकड, खेंकटेखोर, खळ्या, खळवादी, खंडगूळ, अटीवाळ, अडजात, अडफांद्या, अडगाऱ्या, गाताडा, झकर, कुटिलबुद्धि, कुटिलाशय, विपरीतकर्ता, विपरीतकारी.

**कवडीचुंबक.** कवडीटंक, कवडीचुंबक, कवडीपूत, दमडीपूत, दामचुंबक, लोहचुंबक, कंजूस, झारेकरी, सोनार, सराफ, किडेमारी, —भा० सं० तुपांतील माशी चोखणारा, कर्णाचा अवतार, उदारकर्ण, कर्ण, वेरूळचानिचाड्या, मड्याचें ताळव्याचें लोणी खाणारा, गाढगें धुउंन कढी करणारा, आंगचें पाप नदेणारा, आंगचामळ नदेणाणारा, पाप देणार नाहीं, पुण्य कोठून देणार, हा चमडी देईल पण दमडी देणार नाहीं, मुंगीमुखींचें शीत घेणारा.

**कवडीमाल.** बिनकिमतीचा, नालायक, गैरी, अयोग्य, एर. खेर, गदळ, गयाळ, फुकटा, नाकारा, निपटारा, हेटा, खकान, गुणावेगळा, निर्गुण, दीडदमडीचा, दमडीच्या किमतीचा, दमडीच्या मोलाचा, क-

वडेचा, टाकाऊ, यारदा. यारदी, मुरदाड, तृणवत्, तृणप्राय, फरशेर खैरीशैरी, खटनट, खुदरापादरा.

**कल्पक.** याजक, कल्पनावाज, कल्पनेचा, उपायी, चतुर, युक्त्या, युक्तिमान, साधनी, लागलाव्या, युक्तिवान, लाग्या, अनुसंधानी, संधानी, करामती, हिकमती, हुनरी, हरहुनरी, इलमी, इलंबाज, उपायज्ञ, मार्मिक.

**कसबीण.** कळवंतीण, कंचणी, रंडी, रांड, वेश्या, बाजारीण, बाजारबसवी, बसवी, बाजारचोखाट, सामान्या, वेश्या, गणिका, वारांगना, वारस्त्री, वारवधू, रूपाजीवा, सर्ववल्लभा, मालजादी, उष्टीपत्रावळ.

**कळलाव्या.** आगलाव्या, कळीचानारद, नारदमुनि, कडजेदलाल, कळचेव्या, कळचेतव्या, फुणगीलावणारा, फुंकणारा, तेलओतणारा, कैपाति, वीरभरणारा, दुव्याव्या, लावालावी करणारा, गृहभेदी, घरभेद्या, घरघाल्या, घरफोड्या, घरनाशा, घरमारू, खाजाळ, खजाळ, खेळ्या, चेरगडी. भा ० सं ० लोकांच्या घरावर कुत्रे चढविणारा, दाणे टाकून कोंबडे झुजविणारा.

**कळवणें.** जाणवणें, सांगणें, सुचवणें, समजावणें, बोधवणें, बुजावणें, ज्ञापवणें, विज्ञापणें, उपदेशणें, खबरबातमी - वर्तमान - वार्तादेणें, जाण - सूचना करणें — देणें, बोध — प्रबोध — ज्ञापन — विलापनकरणें, माहितगार — माहीत — जाणता — बोधित — सूचित — श्रुत करणें.

**कळाकौशल्य.** युक्ति, युगुत, हिकमत, कला, कुशलता, कसरत, कौशल्य, चातुर्य, कसबदारी, कसब, कारागिरी, हुन्नर, कडासणी, छाप, छापी.

**कारभारी.** वहिवाटणारा, चालवणारा, निर्वाहक, व्यवहरता, वहिवाटदार, पुढाइत, पुढाकारी, पुरस्कर्ता, पुरस्कारी, पुढारी, मोहरकाढ्या मोहोरक्या, मोहोरपी, चालक, नायक, घटक, नेता, वाहक, मुखरण, मुखरणी, मुखरीण, सुकाण्या, नांगऱ्या, पुढच्याजोनाचा, सूत्रधारि, सूत्रधारी, बिनीचा, सारथी, मुकुटमणी, अध्वर्यु, धनुर्धर, कारणी, धनी, नरसिंह, नाक, प्रमुख, पुरस्सर. — आचार्य, याज्ञिक.

**कावेदार.** कावेखोर, कावेबाज, काव्यादाव्याचा, मकरी, कपटी,

कसब्या, कसबानी, धूर्त, शठ, वाट, वाटगा, छद्मी, कारस्थानी, मतलबी, लागलाव्या, लाग्या, हुन्नरी, हिकमती, काटाचा, हिक्मबाज, गुंड, गुंडा, डावपेंचाचा, मतलबदार, कवाइती, कवाइतदार, छक्यापंजाचा.

**किलकिलणें.** किलबिलणें, खटपटणें, अतिवाद — वाग्युद्ध — हंवेतुंवे — हमरीतुमरी — कटकट — खटपट — खळखळ — खळकेवळके — खडवड — हटतट — कचकच — कचाक-च — कलागत — कलकल — करकर — किलबिल — घस-मस — वाक्पारुष्य — हर्षामर्ष — विप्रलाप करणें - चालणें — होणें धसपस — धसापसी — धसपस — धुसमुस — रसकस — खडका — धडका — धडकाधडकी — तडकाफडकी उडणें — झा-डणें — चालणें — होणें.

**कुटुंब.** घरदार, घर, घरचे लोक, घरचीं माणसें, परिग्रह, परिवार, रांडपोर, खटला, खटलें, मुलेंमाणसें, बाइलभिडंग, बाइलवडगा, बीजार.

**कुटाळ.** घातक्या, घातक, घातकी, घातपाती, अपकारी, अपकारक, ना-सरा, नाशा, नासाड्या, उपद्रवी, अवगुणी, कुचाल, कुटोल, नाठाळ, द्रोही, द्रोहबुद्धि, अपकारबुद्धि, अहितबुद्धि भा ० सं ० कंटक, बाहवा ग्रह, दशमग्रह, ग्रह, कुचोद्याचें पाखरूं.

**कुभांड.** कूष्मांड, कुदांड, कुफराड, व्यूह, विभ्रम, कचाट, किचाट, उ-चांड, खेकटें, तरकट, बगलाट, कुलगंड, कुवडें थोतांड, कंवटाल, भारूड, कैपत, कुसृष्टि, कुकल्पना, तकराळ, पाखंड.

**कुमारी.** कुमार, कन्या, नवोढा, कुमारिका, गौरी, अक्षता, अक्षतयो-नि, अविद्धयोनि, अनन्यपूर्वा, पुरुषास्पृष्ट.

**कृपण.** लोभी, लोभिष्ट, चिकण, चिकट, चिकटा, चिकटू, चप्पूचक्कू, किरटा, केण, केवटा, केवटी, कद्रू, दरिद्री, हाताचा जड, जडहाताचा, हाताचाचिकट, मिटमिट्या, किरमाडा, हिमटा, हिमटी, हिचूटा, बारी-क पाहणारा, बारीकदृष्ट्या, अदाता, अदत्त, अनुदार, छट, शट, विच-पट, दृढमुष्टि, बद्धमुष्टि, अव्यय, व्ययशत्रु, व्ययशंकित, अल्पवृष्टि, दातृत्वहीन.

**कृपा.** अनुग्रह, कृपाळूपणा, मेहर्बानी, मेहरबानगी, मेहर, मोहबत, कृपाशीलता, कृपालुता, परोपकारिता, लोकोपकारिता, उपकारशील-

ता, उपकारबुद्धि, परोपकारबुद्धि, परहितबुद्धि, जनकृपा, लोककृपा, लोकहितेच्छा, भलाई, भलाईकी, भलीभलाई, माणूसपणा.

**कृपाळू.** कृपावान, कृपावंत, कृपाशील, कृपायुक्त, कृपाविशिष्ट, कृपान्वित, उपकारक, कृपाभरित, कृपापूर्ण, कृपासंपन्न, कृपाढ्य, कृपामय, कृपाप्रचुर — भा ० सं ० कृपानिधि, कृपासमुद्र — सिंधु — सागर — अब्धि, कृपाकर, कृपानिधान, कृपाराशि, कृपामूर्त्ति, कृपापुरुष कृपाघन, कृपारूप, कृपाभूत.

**कोडगा.** निगरगट्टा, घायकटार, घायखेटर, निसूक, निदर्दी, बेपरवा, बेदर्दी. भा ० सं ० लतगाढव, लतकोडगा, अतकुटा, लातबुक्या, खेटरखाऊ, कोडगेखाऊ, लाज टाकलेला, निलाजरा, मेलेंमढें आगीला भीत नाहीं, लातबुकी सदासुखी.

**कोमणें.** कोमेजणें, कोमावणें, कोमणें, कोमाइणें, वाळणें, सुकणें, सुकटणें. मरणें, करपणें, बावणें, बाकुटणें, झोंबणें, झेमणें, कोळ होणें, सुकवणवाळवण, सुकवशी होणें, रंग — टवटवी जाणें.

**क्रीडा.** खेळ. क्रीडन, ख्यालीखुशाली, खेळी, खेळीमेळी, कौतुक, इच्छाविलास. लीला, केलि, तमाशा, मौज. मजा, मस्करी, कुतूहल, रमण, रमणूक, विलास, हेला, विहरण, विहार, ऐशआराम.

## ख.

**खाऊनिंदक.** भा ०सं ० खादनिंदक, गाईचा गोहीरा, अस्तनींतला साप खाल्याघरचे वासे मोजणारा, खाल्या अन्नावर उठणारा, खाल्या अन्नावर माती घालणारा, बारा वर्षे खाद्यावर वागविलें असता अस्ते उतार, दूध पिऊन विष ओकणारा, पोसल्या पोरा कायकरशील, तर म्हातारीचे डोळे काढशील, ज्याचा मंत्र त्याच्यामस्तकावर हात ठेवणारा, जेथें खाल, तेथें हगाल, वाळूवर मुतल्याने फेसनापाणी, ओलीनाखोली, आईच्या खाटल्यावर चढणारा, माय न ओळखी तो गाय काय ओळखी, बापास बाप म्हणत नाहीं तो चुलत्यास काका कोठून म्हणणार.

**खचीत.** साफ, स्पष्ट, धडधडीत, खास, निक्षून, खामका, निखालस, अवर्जू, ठासून, अगत्य करून, उदमेखून, आक्षेपून, हटकून, तात्पर्या. आहस्थ, पाराछिन्न, निक्षून, अवश्य, जरूर, खरोखर, खरोखरी, भलपत्ता.

**खाज.** कंडु, कंड, कंडी, कंडा, खवखव, खुरखुर, खुरखुराट, खुदखुट, खुटखुटी, वळवळ, हुळहूळ, मुंगा, सळका, चव, चेव, कढ, उकडीधाम, खुमखुम, इष्क, फुरण.

**खाणें.** भक्षणें. अशन करणें — भक्षस्थानीं घालणें, धडांत टाकणें - घालणें - उतरणें, प्राणपूजा - पोटपूजा करणें - खाऊन टाकणें, खाऊन लखलखीत करणें, खाऊन ठार करणें, मटगोळा करून टाकणें, चाटूनपुसून खाणें, निपटूनशिपटून खाणें, झडती लावणें — देणें, चट्टामट्टा - तळझाडा - तळपट - निःपात - निसंतान - सफेजंगी - सप्पा - निरानिपटा करणें, चाटूनपुसून नाहींसें करणें, कडाचूर करून टाकणें, चपेट अथवा चपाटकरणें, पस्तखाणें, रपाटणें, झपाटणें, चपाटणें, ताव देणें, पूज करणें, उपटून खाणें, सपा उडवणें, रगडणें, रपाटणें.

**खादाड.** खाऊखादाड, अधाशी, अघोरी, दपटून - रपाटून जेवणारा, बळकट जेवणारा, खाणोरा, दपट्या, बहुभक्ष, बव्हाशी, बहुभक्षी, बहुभोजी, बहुभुक्, अत्याशी, अत्याहारी, अमितभक्षी, अमितभोजी, अतिभोजी, वृकोदर, उदरपरायण, घासानेंआगला, खग्राशा, घस्मर, औदरिक. भा ० सं ० अगस्ति, उदरपिशाच, कुक्षिंभरि, खायाला काळ, खादाड मावसा, पोटबाबू, पोट्या, पोटार्थी, पोटभरू, पोटभऱ्या, खादू, खादूनंदन, पुखानंद, रावणाचीखाई, दुर्वासऋषि, राक्षस, लाहंबर, पोटांत ब्रह्मराक्षस वाळगणारा, भीम, बकासुर.

**खिसखिशा.** खाष्टी, खाष्टीखोर, खंक, खंकाळ, खष्याळ, खटखट्या, जिद्दखोर, जितखोर, खेकड, खडतर, खलेल, खेन्या, खडंगूळ, काविरडा, जिकोरी, तिरसट, तिसकूड, तिडका, तिडतिडा, सदावक्र, हिरवा, हिरवट, तुडस, तुसडा, तुटक, तुटसाल, कैदी, कर्कश, द्रुष्ट, दुष्ट, दाष्टिक, असंतोषी.

**खोटा.** खोटसाळ, खोटारा, लटका, लटकुरा, कपटी, मनाचा कपटी, मनाचा कुजका — खोटा, निमक हराम, बेइमान, अप्रमाणिक, सकपट, कपटमति, कृत्रिमि, कुडा, कूड, हाडाचा खोटा — वाईट, लटका लांडा, लटका फटका, लबाड लासाड.

## ग.

**गप्प.** बकबक, बकवा, बका, बकवाद, बडबड, खबरा, भाकडकथा,

गाथा, कोरड्या गाथा, थकडंतिकडं, अगडतगड, भगडबगड, बरळ, बडबडाध्याय, गोष्टिश्राद्ध, लाफा, गवगव, गवगवा, गलगल, फकाड्य, जल्प, जल्पना, वाग्जल्पन, विप्रलाप, भाजीपाला.

**गप्पीदास.** बडबडणारा, बकबकणारा, बाताकुटणारा, चराचर बोलणारा, बडबड्या, बकबक्या, गप्प्या, गप्पाअष्टक्या, चावट, फकांडेभाष, वाचट, वाचाल, वायचाळा, जल्पक. भा० सं० तोंडावर नक्षत्रपडले-ला, गागादीक्षित, बोलघेवडा, बोलगाडा, गडबड्या, तुरूतुरू बोलणारा, बालबाल, लवनलव, वाजतेंघाट.

**गर्व.** अभिमान, अहंकार, अहंकृति, दर्प, मोपणा, मगरूरी, माज, मा-नूरीपणा, मस्ती, मस्तवाली, बदमस्ती, मद, उन्माद, दिमाक, दिमा-कदारी, पत्राज, अकड, तोरा, तोरेदारी, मान, अहम्मान, अहंमति, आत्माभिमान, आढ्यता, दम, दंभ, ताठा, इशीम, खट्टा.

**गर्विष्ठ.** गर्वित, गर्वि, अभिमानी, साभिमानी, मानी, मानवान्, अहं-कारी, अहंकारवान, अहंमानी, साहंकार, साभिमान, मगरूरीचा, मगरू-र, दिमाकाचा, दिमाखदार, दिमाखी, पिळदार, तोरेदार, चढेल, वरडोळ्या, मस्त, मस्तवाल, उन्मत्त, बदमस्त, उदमस्त, दर्पित, मा-जोरा, माजोरी, उन्नतशिरस्क, अविनय, — गर्वाधीन, मदाकुल, म-दाविष्ट, मदाक्रांत, प्रमत्त, दर्पध्मात. भा० सं० गजमस्तकारूढ, मगरमस्त, जालीम, डोळे ताठलेला, यास आकाशपाताळ एक, याच्या डोक्याला आभा-ळ लागूं लागलें अथवा दोन बोटें उरलें, याच्या अंगीं तीन मण तिखें जळतें. (-होणें) फुलणें, माजणें, मातणें, चढणें, फुगणें, जडावणें, जडकावणें, मस्ताव-णें, उफाळणें, उनणणें, उटानणें, उंडारणें, शेफरणें, गजस्कंधीं बसणें, आस-न जड होणें, मान चढणें, डोईने चालूं लागणें, डोळ्यावर धूर येणें, उरफाटें फिरणें — चढणें, पारडें चढणें, अथवा जड होत जाणें, शेंड चढणें, अडी-च कांड्यावर येणें, — इशीम बाळगणें — भोगणें, आढ्यता मिरवणें -- बाळगणें — ओढणें, प्रतिष्ठा बाळगणें — मिरवणें, मान खांद्यावर नसणें - चण्याच्या झाडावर चढणें.

**गलबला.** गलगल, गलबल, गलका, गलगा, गलगला, गवगवा, गडबड, गर्दी, गल, गुलगलवा, हूल, हाकहूल, हूलचाल, कल-ला, कोलाहल, कोल्हाळ, कल्लोळ, कलली, बोंब, बोंबा, बोंब, बोराण, उ-कड, बैदा, हंगामा, ब्रह्मघोळ, घोर, हाकाटा, हाकाटी, दंगा, खणका, टांका, गजल, जनरव — गलबलाट, कलकलाट, गलगलाट, कुलकु-

झाट, गोंगाट, कोकाट. भा० सं० घरडोईवर घेणें, धिंडणें, गर्दी करणें, महारगजाल, बलबलपुरी, लग्नघर, बाजार, बाजारवाडा, बाजारघर-कोळणीचा बाजार.

**गांजणें.** छळणें, छडणें, जाचणें, चालवणें, त्रासणें, जाळणें, खाजवणें, सतावणें, श्रमवणें - गांजणूक — जाचणुक -- जाचणी - छळणूक - छळ - छडणूक - जाचणुक - चाळवण - चाळवणूक - छलना - भाजणूक - काचणी -- कुचाली — कुचेष्टा — कुचंबधा — खवंडाळी करणें — जांच — काच देणें. भा ० सं ० जाळणें, डाचणें, चिताघणें, तळणें, तळतळावणें, भाजणें, तोडणें, भंडावणें, घोळणें, घाटणें, थटणें, खलखलावणें, रडवणें, धुरावर धरणें, हायासभणणें, छळीछळणें, प्राण — जीव खाणें, जिवाचा घोट घेणें, जीव तोडणें, जळींत जाळणें, आंतडीं निपसणें, हाडें मोडणे — घुसळणें — खिळखिळी करणें, खोड काढणें, नळीं नख देणें, जिवाला भरडीं — दरडीं घालणें, काध्या घासणें, कुतरओढ — लांकड तोडकरणें, कांचणींत धरणें, काचणीकावणें, उपमर्द करणें, वाटूनघाटून पिणें, खडे खाववणें, फोडून खाणें, वाटघाट — खाजवाखाजव करणें, प्रकार — तऱ्हा — परवडीकरणें, तळासळ देणें.

**गारूड.** गौडबंगाल, भानामती, भानामतीचा खेळ, बाजेगरी, नजरबंदी, दृष्टिबंधन, दृष्टीबंद, इंद्रजाल, छाछूं, जंतरमंतर, हातचलाखीचा खेळ, हस्तलाघव, माया, बुचदृष्टि.

**गांवढळ.** गावरानी, खेडेगांवचा, खेडेगांवी, गांवठी, गांवव्या, खेडोळ, खेडवळ, खेडूला, खेडाळू, गांवटी, ग्राम्य, ग्राम्यक, कुणबाऊ, शेतपोतचा, शेतसंबंधीं.

**गुठमळणें.** कांकरणें, गुलमुळणें, गुरमळणें, घुरमुळणें, आखंकणें, अबाकणें, गणवणणें, गणगणणें, कुडकुडणें, गुरटणें, तरंगणें, घोटाळणें, डगणें, डळमळणें, अडखुळणें, बुचकळणें, मागेंपुढें पाहणें, कांकूं-कासकूस - नानू - कानकून - कुडकुड - धरसोड करणें, कचरून करूं करणें, धईखाऊंमंइखाऊं करणें, आंत बाहेर होणें, मन खालवर होणें.

## घ.

**घांसखाऊ** तुकडमोड्या, भाकरमोड्या, जेवताग्रण, कणाईत, कणकरी, फुकटखाऊ, फुकट्या, पोटपोश्या, भईतोजी, भईतोबा, आयतगब्बू,

भोजनभाऊ, भोजन्या, मेजवान, अजगरवृत्तीचा, आयत्या पिठावर रेघा ओढणारा. म्हा० सं० कन्हतो कुथतो, मळ्यांयाला उठतो, धन गायाला, पाहिजे चांगले दोन शेराचें आण काम करायाला नको काडीचें, जेवायाला आधीं निजायाला मधीं कामाला कधींमधीं, तोंबऱ्याला पुढें आणि लगामाला पाठिमागें, खायास काळ आणि धरणीस भार.

## च.

**चंचल.** चपल, चंचलचित्त, चंचलवृत्ति, तरल, वावसा, लहरी, लहरीदार, लहरीबहरी, उडाळटप्पू, उडाणटप्पू, उचलमावडा, अस्थाई, अस्थिरबुद्धि, क्षणिकबुद्धि, क्षणचित्त, क्षणिकवृत्ति, तिरतिरा, हरिद्वाराग, छंदखोर, छांदिष्ट.

**चट्टीपट्टी.** (पुरुषाचा) ठिळाटोपी, टिळेपट्टे, चट्टेपट्टे. (स्त्रीची). चट्टीपट्टी टाकमटिका, टाकमटिकला, टाकमटिळा, टाकमटिक, टिकलीमिकली, वेणीफणी, काजळकुंकू, टिकलेभांगले, चांगभांग.

**चंद्र.** चांद, चंद्रमा, सोम, इंदु, शशी, शशधर, शशांक, नक्षत्रनाथ, विधु, सुधावशू, निशाकर — चंद्रकला, चंद्रबिंब; चंद्रोदय; चांदरात्र; पूर्णिमा; पूर्णचंद्र; बालचंद्र; घातचंद्र; प्रतिचंद्र; चंद्रमंडल; उतरती कळा; चढती कळा; चंद्रबळ; अर्धचंद्र.

**चव.** रुचि, गोडी, स्वाद, रूच, मजा, मजेदारी, रस.

**चवदार.** रुचकर, रुचीक, मजेदार, गोड, मिष्ट, रसवान, चणचंणीत, खमंग, चरमरीत, खारटतुरट, चविष्ट, रुच्य, रोचकव, सुखास्वाद. सुरस, सरस, स्वादिष्ट, स्वादु, मुखप्रिय.

**चहाडी.** बलांट, तुफान, तोहोमत, तोवत, आळ, चुगली, थोतांड. बगलांट, बलांड, कुफराड, अदावत, कूट, नालस्ती, पैशुन्य, तकराळ, अपवाद, अभिशाप, असूया, निमित्त, पेलकूट, कैवाड, चकारी.

**चाल.** दस्तुर, रीत, मार्ग, पंथ, पथ, शिरस्ता, संप्रदाय, पद्धत, परिपाठ, पाठ, धारा, पेंडोळा, धारे, पेंडोळें, वहिवाट, भात, रिवाज, मामूल, शेरा, ओळवटा, राहा, रहाळी, रवेस, प्रघात, प्रचार, प्रथा, दंडक, मोळा, अचार, आचारण, चर्या, व्यवहारण, अनूसरण, अनूसार — वृद्धाचार, आचार, शिष्टाचार, कुलाचार, लोकाचार, देशाचार.

**चित्तवेधक.** द्रव आणणारा, करुणा रसाचा, रसिक, रसभरित, करुणारसभरित, करुणाजनक, करुणोत्पादक, करुणामय, करुणात्मक, कारुणिक, करुण, करुणापर, द्रावक, चित्तद्रावक, वेधक, मनोवेधक, हृदयवेधक, चित्तमोहक, हृदयंगम, मर्मोद्रावक, चित्तार्द्रकारी.

**चित्रविचित्र.** परीपरीप्रकारचा, तऱ्हेतऱ्हेचा, भांतीभांतीचा, अनेक, अनेक तऱ्हेचा, अनेक प्रकारचा, अनेक जातीचा, नानाप्रकारचा, नानाजातीचा, नानाविध, बहुविध, अनेकविध, नानाजातीय, विविध, अनेक जातीचा, चित्राविध, पृथक्‌विध, बहुप्रकार, विजातीय, जिन्नसवार, ऐलपैल, नाना.

**चेंगट.** वेळ लावणारा, उशीराचा, दिरंगाईचा, ढिला, ढिल्या, ढील, सावकाशा, चेंगटी, चेंगव्या, विलंबी, दीर्घसूत्री, दीर्घसूत्र, मंद, जड, चिरकारी, चिरक्रिय, जडक्रिय, सुस्त, सुस्ता, लिगशा.

**चेष्टेखोर.** चेष्टेबाज, खोडकर, छंदी, छांदिष्ट, छांदस, कुचेष्टखोर, खोटसाळ, टवाळ, टवाळखोर, द्वाड, टारगा, टार, टोर, चारगट, उत्पाती, दुर्गुणी, अचपळ, झटेल, झटेली, चाळक, कारटा, कारटामोरटा, ढंगी, ढंग्या, भिजवटा, धांदली, धांदल्या, व्रात्य, क्षणछंदी अपस्मारी — (पोर किंवा मुलगें) अवतार, अवतारी, धाड, आततायी, अजात, पलित, जिवंत, पिशाच, खवीस, व्यतिपात, व्यतिपातावर झालेला, कुलनाश, जन्मकुराड, जन्मांतरीचा वैरी, चूड, विस्तव, खूळ.

## छ.

**छक्केपंजे.** अकडंतिकडं, इदर तिदर, घटपट, गड्डं पड्डं, गड्डेपड्डे, गड्डेपड्डे, इंगेतंगे, हिंगेतिंगे — अळंटळं, लपंडाव, कावव दावड, चकरमकर, झुलवा झुलव, टालमटोला.

## ज.

**जलदी.** लवकर, वेगी, वेगून, जलद, सत्वर, त्वरीत, शीघ्र, वेगत, वेगें, वेगीं, भडभड, लवडी सवडी, चालताबोलता, चालतबोलत, थुंकीपाळून, घोड्याचे पाठीवर.

**जादू.** जादूगिरी, चेटक, बीरविद्या, शाबरी, पिशाचविद्या, कुविद्या, असद्विद्या, अविचार — तोटगा, कुवेडें, कुडं, कुडवेडें, मूठ.

**जिंकणें.** वश – स्वाधीन करणें, जित – पराजित – पराक्रांत करणें, वटणीस – जेरीस आणणें, हुकमत – अमलांत – ताबेंत आणणें, दम – दमन – निग्रह करणें, हस्तगत – सर करणें – भुईस – धुळीस – जमिनीस मिळवणें, जमीनदोस्त – चीत – पादाक्रांत करणें, लोळवणें, लोळसावणें, मारून चुरा करणें, मारून पीठ करणें, धूळ करणें, खाणें.

**जितेंद्रिय.** दंडित, दमित, संयमित – विषयातीत, मोहातीत, विरक्त, वीतकाम, वीतराग, वीतस्पृह, संयतेंद्रिय, विषयपराङ्मुख, आ० सं० बैरागी, गोसावी, संत, प्रशांत, मनुष्य, प्रशांतात्मा, त्यागी, संयमी, वैराग्यशाली, तपःशाली, वशी, देहीं असूनविदेही, जितकाम क्रोधादि.

**जीव.** प्राण जीवित्व, चेतना, चैतन्य, दम, जीवकला, जीवनकला, प्राणवायु, पंचप्राण, भूतात्मा, जीवात्मा.

**जुना.** बहुतकाली, बहुतां दिवसांचा, बहुत काळाचा, बहुत दिवसाचा, फार दिवसांचा, फारदिशी, जुनाट, पुराणा, पुराण, पुरातन, प्राचीन, बहु कालिक, चिरकाळि, चिरस्थाई, चिरंतन, कदीम, कधींचा, कदा काळांचा.

**जुलूम करणें.** जुलूम ज्यास्ती – जबरी करणें, पिळणें, पिळूनघेणें, जाचणें, जाळणें, पिडणें, घोटणें, खळणें, चेंगरणें, चेंचणें, जळजळाट – उपमर्द – उपद्रव करणें, खल घेणें – मांडणें सं० घाण्यांत – चरकांत घालणें, करवतीं – चरकीं – करवा खालीं धरणें, खडे खावविणें – तारणें, जळीत जाळणें, तेलकाढणें, पुरेंपुरेसा – नकोनकोसा करणें, नाकीं नऊ आणणें, त्राहीत्राही करणें.

## झ.

**झपास्याने.** चलाखीने, झटपटीने, कडाक्याने, धडाक्याने, कडकडून, कडकाऊन, कचकाऊन, करकचून, तडकून, तडकाऊन, रगडुन, तकट, तकटुन, खपाटन, खसाटून, धसकन – कर – दि-

शी, धडकून, धडधडून, तडक, धडक, धडधडा, कडक्का मारून, चळकट, चळकटून, झपझप, झपझपां, झपाझप, झपापां, भरभर, भरभरां, भराभर, भरारां, झरझर, झरझरां, झराझर, झरारां, झडझड, झडझडां, झडाझड, झडांडां, फडफड, फडांडां, फडफडां, फडाफड, चप, चपाचप, चपचपां, चपांपां, पटक्का पटकी, पटपट, पटपटां, पटापट, पटाटां, खडाखड, खडाखडी, खडोखडी, ताबडतोब, झबकन, मटकन, फटकन, झटकन, चटदिशीं, भरकन, चपक, तुरूत, तूर्त, तूर्तचेतूर्त, तूर्तांतुर्त, तूर्तातूर्त, हातोहात, हातोपात, हातचेहातीं, उठाउठी, उभाउभी, उभाउभा, उभ्या उभ्याना, धूम, लवलाहे, लवलाही.

**झोंप.** निद्रा, नीज, शयन, सुप्ति सुप्त, स्वाप, सर्वेंद्रियाव्यापार — अघोरी निद्रा, असूरी निद्रा, गाढमूढ निद्रा — काळझोंप, साकर झोंप, सुषुप्ति.

## ठ.

**ठक.** ठग, ठकबाज, दगाबाज, दगेखोर, सोदा, कारीगर, काबूयार, हिक्लेबाज, वंचक, गुंडा.

**ठकबाजी.** ठकाई, ठगाई, ठकविद्या, ठकूविद्या, दगाबाजी, दगलबाजी, सोदाई, सोदेगिरी, सोदेशाई, लबाडी, गुलामगिरी, काबूयारी, लबाडी लैंचांडी, लबाडी लातांडी, लबाडी लाताळी, लकारी, काळेंभेरे, धत्तूरा, ठकडेपणा छटपणा, धूर्तता, धूर्ताई, धौर्त्य, धौर्तिका,

**ठकविणें.** फसविणें, भोंदणें, वंचणें, प्रतारणें, भोळसावणें, भोळावणें, भुलकावणें, दगा देणें, ठकवणूक, फसवणूक — वंचना, प्रतरणा करणें, भा० सं० मुंडणें, घालणें, चकवणें, झकवणें, ठेंगाळणें, दाडळणें, फठवणें, धंदरणें, झाजरणें, शिमाटणें, शेंटाळणें, हिंसटणें, हिसकणें, गळाकापणें, गुंगारा — झोली — टोला — पटका — चट्टा — गोता — झोका, धुरी, धूर, बालादेणें, गुंगारा मारणें, डोईवर हात ठेवणें, अथवा फिरवणें, तोंडावरून हात फिरवणें, तोंडास पानें पुसणें, धाव्यावर बसवणें, धूप — धत्तुरा दाखविणें, पागोटें गुंडाळणें, हातावर तुरी देणें अथवा देऊन पळविणें.

**ठोकजोशी.** देव सांगणारा, होतव्य सांगणारा, जोशी, मेंढेजोशी

डाकोंचा, कुडबुडा, कुडमुडा जोशी, सर्वदाजो ० पिंगळा जोशी, काल-बेल्या, नक्षत्रसूचि, दैवज्ञ, दैवलेखक.

## ढ.

**ढपळवणी.** विरबिटी, थिरबिटी, पेजवणी, फजीता, गंजवणी, घुमंड-गुळवणी, पळकवणी, झुळकवणी, गरगट, डुळकवणी, कळकळवणी, झांखवणी.

**ढोंगी.** दंभी, दांभिक, डंभी, भगली, भगल्या, मक्करी, वेषधारी, मनांतएक जनांतएक, मिसखोर. भा ० सं ० गायतोंड्या, गोमुख्या, सत्त्भावार्ती, भगलभावार्ती, बकध्यानी, बकवृत्ति, बोकेसन्याशी, बैडालवृत्तिक, शांतिब्रह्म, गोमुखव्याघ्र, मेंग्यामारवाडो, हसतांहसतां दांतपाडणारा, साखरेचीसुरी, हातावर साखर आणि मानेवर कातर देणारा, मानभाव, गोडबोल्या आणि सालसोल्या, तोंडावर अथवा तोंडापुढचा गोड, इंद्रावण, गुळधोंडा, मिसकीन मारवाडी, मिस्कीन, मात्रागमनी, सात्विक चांडाळ — धर्मध्वजी, मिल्हा, सदानाक धरून बसणारा.

## त.

**तगादा लावणें.** धरणें करणें, धरणें बसणें, तगादा बसणें, तगाद्यास बसणें, खटपट घेणें, खणपटोस लागणें — येणें, धुणी घालून बसणें, गोण घालून वलणें, खिळण घेणें — धरणें, ताण देणें, पायाशी पाय बांधून बसणें, खपाटीस बसणें — लागणें, आधिवासन — अधिष्ठान करणें, मेखाटणीस — मानगोटीस — गरगोटीस — गळचेपीस — बोकांडीस बसणें, गळीं पडणें.

**तपास करणें.** शोधणे, चौकसणें, तपासणें, पाहणें, परीक्षणें, शोध — सूड घेणें — काढणें — करणें, छडा, छडणूक, छडाछड, काढणें — पाहणें — लावणें, अन्वेषणें, चौकशी — तपासणो — विचारपूस करणें — निहाळणें, निरेखणें, टेहळणें, पेरणी करणें, डोळेभर पाहणें, डोळ्यांत तेल घालून पाहणें, दिव्याचातीनी शोधणें, काटकोणा मोजणें.

**तारुण्यदशा.** तरणेपणा, तरूणपणा, जवानी, पहिली पराई, तारूण्य.

तारुण्यावस्था, नवती, यौवन, यौवनावस्था, तरुणकाळ, पूर्ववय, प्रथमवय, कौमार, शैशव, पौगंड, यौवनकाल, काळेकेश — नवतीचा भर, नवतीची लहर बहर, तारुण्याचा ऊत, तारुण्यबल, जोम, उधान, नवतीचा पूर, मुसमुसी, जवानी.

**तालेवंत.** लक्ष्मीवान, लक्ष्मीवंत, श्रीमान, श्रीमंत, श्रीकार, तालेवार, बखतवार, कृतार्थ, कृतकृत्य, कृतकृतार्थ, चारितार्थ, प्राप्तयश, पद्महस्ती, वरदहस्ती, यशस्वी, जयी, कल्याणी, मातापिता, भद्र, क्षेम.

**तिखट.** तिखट जोम, तलख, तीक्ष्ण, तीव्र, खरा खरट खविरडा, खवट, टितक्त, खर, प्रखर, कडक, खरमरीत, चरमरीत, चरचरीत, कट तेजवान, जहाल, जलाल, जालीम, झणझणीत, चणचणीत, जळजळीत, भगभगीत, ठसठसीत, तिखटमीठ लाऊन सांगणें.

**तिखटमीठ लावून सांगणें.** फुगवणें, फुगवून — वाढवून सांगणें, मीठमिरची लावणें, हातपाय लावणें — फोडणें — लावून — फोडून सांगणें, काव्याचा नायटा — मोहरीचा मेरू — राईचा पर्वत — पराचा पारवा — पराचा कावळा — रजाचा गज — एकाचीं दोन, करणें — करून सांगणें.

**तिसमारखान.** धारराव, आरेराव, धोंदाडशिपाई, इमामदांडगा, बीरपीर, समशेरबहादुर, तलवारबहादुर, अडूमाडू, पंचहत्यारी, खणक्या, शतंभीष्म, शूरमानी, शूरमन्य, ढेंगोजी, टेंगोजी, थोट, रगडमल्ल, लठ्ठनिरंजन, लठ्ठभारती, वाघमान्या.

**तीक्ष्णबुद्धि.** जलद, तिखट, तीक्ष्ण, चरमरीत, चणचणीत, चुणचुणीत, शाहणा, हुशार, बहादूर, बाट, बाटगा, पटु, चतरस, डोळस, खडाण, खडखडीत, कुशाग्रमति, तीव्रबुद्धि, प्रखरबुद्धि, सुजाण, तकबाज, तार्किक, ताकी, धूर्त, जीवट, [illegible] कागडा, चिमखडा, चराचिव, पंजाबी, चंच, चंचिबाग, चंचुबाग, मेधावी, प्राज्ञ, सुज्ञ.

**तुकडा.** कुटका, खंड, खांड, खाप, कोरका, शकल, कण कणिका भा० स० कांहींच, कांहींएक, तिळभर, तिळतुल्य, तिळप्राय, लवलेश, लेश, नखभर, काडीभर, काडीमात्र, अणुमात्र, बालाग्र, सुताचा तोडा, यत्किंचित, रजभर, अभावितक, स-

शं, मानसिक, जात, वाण, कला, चिमटभर, वास, सुईच्या अ-ग्रांतील माती.

**तुकडमोड्या.** हांजी करून-खुशामत करून, आर्जव करून, पोटभरणारा, परान्नरुचि. परपाकरुचि, परान्नपुष्ट, परान्नभक्षि. पात्रेसंमित, पानपूजा, वारकरी, पंक्तिपठाण. पंक्तिवारगीर. दंडीकबाल, दंडीदकळ्या. तैलंग्या. तैलंगभट, ताजेघोड्याची गोमाशी, भोजनभाऊ.

**तोटा.** नुकसान, नुकसानी धक्का. हिसका, ढोला, गोता धोका, झोका, खांच, खाच, खोट, टेंच, नहाव, नहावी, खत्ता, चट्टा-घसण, घांसण, घस, घसरा, भोकसा, चपेट, छकड, तोमद, मुर, मुरवण खामी, हानी, ऱ्हास, अपचय, अपाय, क्षति.

**तोंडीलावणें.** ओलवण, भिजवण, कालवण, कोशिंबीर, बोळुकोरड्यास, प्र० अडगर्द, करंबट. करमणें, कोचकई, गरगट, गोज, चटणी, झुणका, पंचामृत, मेतकूट, रसा, रायतें, वरणसवार, डांगर, कोशंबीर.

## थ.

**थपडाक.** चपराक, चपाटी, चापट, चपेटा, चपेट, थाप, थापडी, थपाट, थवकड, थपका, थप्पा, थपाटा, थमाटा, थबल, थप्पल, छकड, चडन, चडकण, चडकणी, चटकणी, वादडा, चापपोळी, आसफोट.

## द.

**दमणें.** शिणणें, भागणें, वैंगणें, अटणें, टणकारणें, टणकणें, चिरकीस येणें, जेरीस येणें, जिकीरीस येणें, कडीस सरी येणें, उरीं फुटणें नाडी आटपणें, हायास येणें, किर्र होणें, जीव तुटणें, उताणा पडणें, नाकीं नऊ येणें, मध्यासयेणें, भूस भुसकट – बूर निघणें - पडणें, घोडे थकणें, रेंगळणें, डेंगणें, तरसणें, कलमलणें, डोईंटेकणें, मरोपुरेसा होणें, सुश्रांतणें.

**दयासागर.** दयासमुद्र, दयाब्धि, दयासिंधु, दयानिधि, दयानिधान, दयाकर, करुणासागर, अनाथनाथ, अनाथबंधु, दीनद-

याळ, दीननाथ, दीनबंधु, आर्त्तसाधु, आर्त्तबंधु, आर्त्ताभिमानी, प्रणतवत्सल.

**दरिद्रीपणा.** गरीबी, कंगाली, अनुपत, दारिद्र्य, दरिद्रदशा, दरिद्रावस्था, दारिद्र, निधनता, निर्द्रव्यता, धनाभाव, द्रव्याभाव, आर्थाभाव, धनहीनता, अल्पधनता, गिरिधारी, दैन्य, ददात, ददाती, चडचड, चणचण, तारंबळ, तंगचाई, तापत्रय, ओढ, ओढगस्ती, अडचण, अडचणूक, चणचण, तारंबळ, तंगचाई, तापत्रय, ओठ वखवख, हलाकी, दुर्दशा. अ० सं० चुलीमध्यें मांजरें व्यालीं आहेत. लीस अक्षत लागली आहे, घरीं शिवरात्र आहे, घरामध्यें नकारघंटा वाजती.

**दाटी.** गर्दी, अडचण, ऐंचण, भीड, गचाड, किचाटी, गर्दी, खच, चिडभीड, चिडमीड, चिडीकामिडी, दाटण, दाटणी, खेट, खोटा, चिलचिलाट, चिरंगट, चंगट, थट, थाट, ठेल, चेपारा, रच, चेंद, चेंदाडा, रगाडा.

**दान.** देणगी, देणें, दत्त, बक्षीस, इनाम, दत्ति.

**द्वाड.** वाईट, खट, खटनट, खल, द्वाडवाणा, खडतर, खचरट, खंबसट, दुष्ट, द्रुष्ट, खराब, नष्ट, नष्टाळा, नाटाळ, कुत्सित, कुटिल, दुर्जन, अधम, पाजी, नीच, जगन्य, कुचाळ, कुताळ, गदळ, कुधान, हिडशा, हिडीस, हेंद्रा, घाणेरडा, मुरदाड, चंडाळ, विजात, विजवटा, वाजात, द्वेष्य.

**दिग्विजय करणें.** अनर्थ करणें, उदव करणें–लावणें, मात–शर्नमर्दी करणें, शक–कीर्त्ति–धूम, धुंवसा गाजवणें, गंगेस घोडे नाहणें, शतक्रतु करणें, ध्वज–झेंडा लावणें, दिवा लावणें, उजेड पाडणें — लावणें – करणें, धन लावणें – पाडणें, निधाई अथवा निथारती लावणें – पाडणें, पाणी जाळणें, दगडास पान्हा – पाझर आणणें, ज्योतिष्टोम – सोमयाग करणें, शिलासेतु बांधणें, गंगेंत घोडे नाहविणें, पुरुषार्थकरणें, कृतकृत होणें, दिवसा मशाल लावणें, आडवी पालखी चालविणें, मालकी मिळवणें.

**दिवा.** दीपक, दीप, चिराग. प्र० लामणदिवा, रामणदिवा, रोगणदिवली, रोमणी, दिवटी, दिवी, दीपिका, कैपत, हिलाल, ठाणवई, समयी, पणती.

**दुष्ट.** वाईट, पापी, पापिष्ट, पातकी, दुर्जन, कुजन, षठ, पिशुन, कुकर्मी, दुष्कर्मी, अधर्मी, अधार्मिक, दुष्टमानस, दुर्गुणी, हरामी, दुराचरणी, दुराचारी, पापाचारी, असदाचारी, अनाचारी. कर्मदुष्ट, पापकर्मी, पापकर, पापकर्त्ता, कुचर, कुमार्गवर्त्ती, दुर्वृत्ती, दुरित, पापपरायण, कुबुद्धि, कुमती, पापबुद्धि, पापमती, पापचेता, तामस. असाधु — पापात्मा, पापस्वरूप, पापमूर्त्ति, पापपुरुष, पापाचा पुनच्या, पापराशि, पापनिधान, पापनिधी, क्रूरकर्मा, भीमकर्मा, घोरकर्मा, कर्मचंडाळ, अधमात्मा.

**दुरोखी.** भा० सं० काळ पाहून चालणारा, रंग पाहून चालणारा, वारा वाहीलतशी पाठ ओढणारा, वारा वाहील तसें करणारा, दोहींडगरींवर हात ठेवणारा, समयानुसारी, समयानुवर्त्ती, कालानुसारी, कालानुरोधी, कालवशानुसारी.

**देव.** भगवान, परमेश्वर, ईश्वरप्रभु, आदिपुरुष — अंखड दंडायमान, अकळ, अगोचर, अंतर्यामी, आनागतविधाता, अनादी, अनादिसिद्ध, अनाद्यंत, अपरंपार, अलक्ष्य, अविनाशी, अव्यक्त, अस्वप्न, आदिकर्त्ता, आदिकारण, आदिपुरुष, ऋणहर्त्ता, कर्ममोचन, कर्मसाक्षी, कर्माध्यक्ष, गतिदाता, चित्, चित्तसाक्षी, चित्तचालक, चित्तस्वरूप, चिद्घन, चिन्मय, चिन्मात्र, चिद्रत्न, चिदानंद, चिद्विलास, चिद्रूप, चैतन्य, चिदाकार, जगज्जीवन, जगत्कारण, जगदात्मा जगदीश, जगदीश्वर, जगदुद्धार, जगद्गुरु, जगद्वंद्य, जनार्दन जीवितेश, तेजोरूप, त्रिकालदर्शी, त्रिकालज्ञ, त्रैलोक्यविस्तार, दीनवत्सल, देवादिदेव, नर, निग्रहानुग्रहसमर्थ, निजरूप, निजमूर्त्ति नित्यमुक्त नित्यसिद्ध, नित्यानंद, निजानंद, निमित्तकारण, निरंजन, निराकार निरालंबी, निराधार, निरामय, निर्गुण, निर्विकार, निर्विकल्प, निर्वाणींचा त्राता, निःसंग, पतितपावन, परमतत्व, परमात्मा, परमपुरुष, परपुरुष, परवस्तु, परमवरिष्ठ, परमहंस, परमेश्वर, पुराणपुरुष, पुरातन पुरुष, पूर्णघन, भक्तकाजकैवारी, भक्तवत्सल, भक्तकाजकल्पद्रुम, भक्तजनाभिमानी, भवभंजन, भवांतक, भवनिवारण, भवदायक, महापुरुष, महालय, मायावी, विराट्देही, विराट्स्वरूप, विश्वनेत्र, विश्वेश्वर, विश्वाधार, विश्वव्यापक, विश्वकुटुंबी, विश्वंभर, विश्वरूप, विश्वात्मा, सगुण, साकार, सर्वसाक्षी, सर्वसुख, स्वानंद, सच्चिदानंद, सकलगुणकंद, सत्य, सत्, सत्यसंकल्प, सर्वतोमुख, सर्वभूतभू-

तांतर, सर्वेश्वर, सर्वोत्तम, सर्वोत्कृष्ट, सोहंमूर्त्ति, स्थूलसूक्ष्म, स्वय-भू, हंस.

**देवी.** पार्वती, गौरी, चंडी, अंबा उमा, काली, दुर्गा, भगवती, काळकाई, जगदंबा, भद्रकाली, भवानी, भैरवी, मंगलागौरी, ज्येष्ठागौरी, महादेवी, महामाया, शांबरी, शाकंभरी, शांभवी, षष्ठी (सठी, सटवी).

**देश.** मुलूख, राष्ट्र, प्रांत, चक्र, भूमि — मध्यदेश, परदेश, स्वदेश, वसाहत, हिंटप्रांत.

**दैव.** दैविक, अदृष्ट, कृतांत, काल, कर्म, पूर्वकर्म, कर्मगति, गति, दैवगति, प्रारब्ध, प्राक्तन, प्राक्तन कर्म, नसीब, लक्ष्मी. भा० सं० कर्मबळीवंत, कर्मबळोत्तर, बलवत्तरकर्म, बळीयाप्राक्तन, बलवत्तरदैव — काळ-

**दैवहीन.** दुर्भाग्य, अभाग्य, हीनभाग्य, भाग्यहीन, मंदभाग्य, हतभाग्य-दुर्भागी, अभागी, हतदैव, दुर्दैव, निर्दैव, हीनदैव, अपेशी, उणेदैवाचा, दुर्दैवाचा, बरंटा, कंकखत, कपाळफुटका, दैवफुटका, कपाळकरंटा, कारंट्या कपाळाचा, खापरतोंड्या, पांढऱ्या पायाचा, प्रारब्धफुटका, फुटक्या — कपाळाचा, दैवाचा — नशीबाचा दुर्भग, दग्धहस्ती, दैवोपहत, अकृतार्थ, अश्रीमान, भद्रचा.

## ध.

**धट्टाकट्टा.** मोठा, धाटामोठा, मोठाधाटा, कट्टापट्टा, पठ्ठ्या पठडा, घटमूठ, झणकट, दणगट, दाट, धमकट, गड्डू, कुप्पा, जाडगा, जाडा, जाड, ताठ, ताठर, जमदाडा, धडाखडा, टणक, टणका, जोमदार, जोधा, जबर, बळकट, धब्बल, धब्दूल, धोक, भक्कम, ऐक्ट, धक्कड, हडस, कल्बूत, धष्ट, धष्टपुष्ट, मुसळ्या, रांकट, कटमस्त, घस्मर, जोरकस, लठ्ठ, लठ्ठ्या, लठ्ठू, लटुंगा, लोठा, गलेलठ्ठ, बठ्ठ्या, गबदूल, गटूना, दंडारना, गचंड्या, दलदपट, बृहच्छरीर, बृहदंग भा० सं० लठ्ठाश्रम, लठ्ठेश्वर, लठ्ठंभारती, लठ्ठानिरंजन, लठ्ठमिश्र, पोळ, धठांगण, धटिंगण, दांडगेश्वर, मुसळकंद.

**धडपडणें.** धडबडणें, तडफडणें, हातपाय झाडणें — आदळणें —

आपटणें, तडफड — तडफडातडफड —-धडफड करणें — मोडणें, आपटाआपट — आदळाआदळ करणें.

**धडाखडा.** धडसा, धडका, धडस, धडसाखडसा, खडखडीत, खडस, खेडसा, खणखणीत, धट्टाकट्टा, धडधाकट, धडधोप, तवाना धड, दोनटक्यांनी धड, ठणक टणका, पाडकुला, कटाक्ष.

**धनवान.** धनवंत, द्रव्यवान, दौलतदार, दौलतवान, पैकेवान, पैकेकरी, पैकेवाला, संपत्तिमान, लक्ष्मीवान, लक्ष्मीवंत, तोंगल, धनिक, धनी, सधन, बहुधन, धनसंपन्न, धनेश्वर, धनाढ्य, धनत्तर, धनसमृद्ध, धनविपुल, धनबहुस, तळीगार, तळीरामगार, श्रीमान, श्रीमंत, तालेवार, तालेवंत, दामोदर, संपन्न, वित्तवान, अर्थवान, अर्थान्वित, सार्थ, आढ्य, गब्बर, गब्बु, कोषवान• भा० सं० कुबेर, जगतशेट-जगतशेटीचा नातु, दयाराम भुकंदासाचा नातू, धालेधन्याचा लेंक, गांडभरू, पावड्यावर पैका ओढणारा, धडीने पैका मोजणारा, लक्षाधीश लखपती, नवकोटि नारायण, नवलाख्या, परीस, पैसेपूर, पैकेपूर, कोटिध्वज उभारलेला, ज्याच्या घरीं सोन्याचा धूर निघतो, त्याच्याघरीं लक्ष्मी पाणी भरती, त्याच्या घरावर तांब्याचीं कवलें आहेत.

**धमकावणें.** खडसावणें, खडसणें, खडकावणें, खमकावणें, खणकावणें, झाडणें. घांसणें, खरडणें, खडखडवणें, दटावणें, दपटणें, दामटणें, दडबडावणें, फडफडावणें, तडकावणें, दणकावणें, दणगारणें, शिंगाटणें, गोपाटणें, झिझारणें, टाळणें, मुंडणें, तासणें, खरड — खरवड — खरडपट्टी — खडस — खडसपट्टी — खरडी — उधळपट्टी काढणें, हजामत — भादरणी - उलटी हजामत — उलटी सुलटी हजामत — मुंडण — मुंडीमोचन — भादरपटी करणें, ताव — सोनताव — दम — तराठा — दट्टा देणें, खाकरवासा घालणें, दपटशा — दपाटा — दराठा — जबडगा - दरारा - घसरा देणें, डोंईचे केश नाहींसे करणें, पूजा करणें — घालणें — कांशा काढणें - भरडणें

**धांगडधिंगा.** धिंगाणा, धिंगामस्ती, खिदडणें, धांगडणें, धमशान, धुमशान, धुमकूस, धुडकूस, धुमड, धूमचक्री, धुमाकूळ, धिबडी, तातकथय्या, ताथय्या, थैथैय्या, थैथैयाट, थैकार, हंगामा, हमामा, हुतुतू.

**धाटणी.** वाणी, भंगी, धाटी, धर्दी, ठाकी, लटक, ठेव, ठेवण, भात्त

मोड, पर्याय, पर, छटा, घटाव, डौल, ढब, दसपी, मूर्त्ति, २ ( शब्दरचनेची ) बाणी, धरती, सरणी, डौल.

**धास्ती.** वचक, धाज, अंपधाक, धोसरा, हैबत, भेदरा, आत, धडती, धपका, दचका, दचक, त्रास, वित्रास — गात्रभंग, अंडत्रास, त्रेधा तिरपीट, तिऱ्हड, भयभाग्य, घोरभय, धैर्यभंग, निक्षेप, वैचित्य. (धरणें) आ० सं० अंडब्रह्मांडास अथवा कपाळीं जाणें, भुलीचें झाड भेटणें. देवाऱ्यांत देव नाहींसे होणें, गर्भगळित होणें, धावें दणाणणें, गांड फाटणें, मलमूत्र होणें, मृतप्राय होणें, गतप्राण होणें, लेंडी गाळणें, हगूट लागणें, हांवहरी होणें, पांचावर धारण बसणें, हगमूत लागणें — सुटणें, तजावजा होणें, प्राण कालवणें, चकली गुंग होणें, चकरमकर भुलणें, हातापायांचे ढोंग होणें, बावरणें, कावराबावरा होणें, कहावणें.

**धूळदशा.** मोड, सैन्यभंग, दाणादाण, भणाण, तारांगण, तारातीर-तारतोडगर्दी, तसनस,धवा, धुमा, धूळ, पट्टाधूळ, धळपट, धूळधमासा, धूळधाणी, फांकाफांक, पांगापांग, तिहडफांक, दाताहत, विल्हेवाट.

## न.

**नकारघंटा.** ठंडुणाट, ठंहणपाळ, खडखडाट, घणघणघंटा, वालोवाल निसंतान, खसखसाट, अस्त, फन्ना, घळघळघंटा, धाव्यावाटी, चणचण.

**नगरभवानी.** भटकभवानी, हिंडफेरी, गावगाई, पांयांवर नक्षत्र पडलो असी, बाराघरची बिल्ली, जिच्या पायांस भिंगरी असनी, अ० भोंवरा पडलेला आहे.

**नटून चालणें.** नटणें, थटणें, नटूनथटून, चालणें, मिरवणें, झुमकण, ठुमकणें, — नखऱ्याने — थकडीनें, - डौलानें - पत्राजीनें चालणें, ठमकत — मिरवत चालणें, उताणा चालणें, उराड काढून चालणें, उरावर चालणें, लटकत चालणें ( स्त्रियांचें ) चमकणें, चमकून चालणें, थमांहनें चालणें.

**नफा.** मिळकत, प्राप्ती, कमाई, पयदास्त, किफायत, सरफा अथवा सरीफा, लाभ, मिळताव, उत्पन्न, आप, आवाय, अवा, जोड, नीट,

उपज, निपज, कमाविसी, गाऊल, गवान, गवानी, अमदानी, प्राप्त्यंश, प्राप्तव्यांश, लभ्यांश, लाभ.

**नमविणें.** खालीं आणणें, हलकावणें, नम्र करणें, उतरणें, मोडणें, अभिमान मोडणें, पाणउतारा - रगमोड करणें, मानखंडन - मानभंग - तेजोभंग - मानविध्वंस करणें लाजवणें, लाज आणणें, रग - रेंच - खोड - माज मोडणें, अखें - खुमखुम; मोडशी - ऊब - भोवळ - खट्टा जिरवणें, मस्तक ठेंगणें करणें, मान - नाक - पागोटें खालीं करणें, खालीं पाहायास लावणें, खट्टा - बरगडा मोडण, शिकल - शोभा - मोठेपणा - महत्व - मंजा - शेंदूर - शोडउतरणें, कान पाडणें बोड करणें, बोडणें, बोडती - फजीती - मुखभंजन - मुखमार्जन - दर्पोपशांति करणें, पट्टी काढणें, पाण्यापेक्षां पातळ करणें, नाककाटणी करणें, पूजा करणें, पत्नी करणें.

**नम्र.** गर्वहीन - रहित - विरहित - विहीन - शून्य, अहंकारावेगळा - निराळा, निरभिमान, अनभिमानी, निरहंकार, अनहंकार, अनहंकारी, नम्रबुद्धि, नम्रमनस्क, नम्रवृत्ति, लीन, दीनवृत्ति, नम्रतेचा, दीनतेचा, लीनतेचा, दीन, दीनवदन, दैनवाना, दीनवाणी, निगर्व, अगर्व, अमानी, निरहमान, मानवर्जित, प्रणत, सविनय, विनयी, विनत, विनयस्थ, विनीत.

**नवा.** नवथर, नूतन, अलिकडचा, अलिकडील, आलीकडला, हल्लींचा, आधुनिक, अर्वाचीन, अप्राचीन, सद्यःकालीन, इदानींतन.

**नवाकरकरीत.** कोरा करकरीत, ताजा करकरीत, कोरा, घनकोरा, घणाखालचा, नव्या ताण्याचा, नवघड, लोणकडा.

**नाम.** (जाति) प्रतिपादक, कारक, कर्तृवाच्य, प्राणिवाचक, भाववाचक-संघवाचक, अपादानवाच्य, क्रियावाचक, अजंत, जातिवाचक, अप्राणिवाचक, करणवाच्य, अधिकरणवाच्य, संप्रदानवाच्य, भावनावाच्य, क्रियावाचक.

**नामर्द.** बुळा, निर्धात, निर्वीर्य, कमरेचा ढिला, मेव्या, फतुला, भागुबाई, नपुंसक, क्लीब, शंड, भग्नध्वज, गतवीर्य, हतवीर, पुरुषत्वहीन, पाउणेआठ.

**नाहीं.** न, ना, उहु ऊहु. भा० सं० नचा फाडा वाचणें, नचा पाठ असणें, नायरी - नासली करणें.

**नाश करणें.** बुडवणें, खराबी – नाश – धरकूड – संपूर्णनाश करणें, भिकेस लावणें, भिकारी – कंगाल – कोल – हतश्री – नष्टश्रीकरणें. भा० सं० देस धडीस लावणें, दारास अथवा घरास काटी लावणें, घरावर गवत रुजवणें, संसाराची मात्रा — संसाराचें मातेरें संसाराचें पोतेरें – संसाराचा पाटावरवंटा करणें, वाटोळें वाटोळें-लांबोळें करणें, घर घेणें - धुणें, धूळ फुंकायास लावणें, धुळीचे दिवे खायास लावणें, ठार बुडवणें, खाड्यांत उतरणें, गळा - मान कापणें, डोई-मारणें, नाडणें, घरावर निखारा ठेवणें, घरावर कोळ राहून देणें, राख रांगोळी करणें, विधुळणीस पाडणें - मिळवणें - मिळवून टाकणें, माती कुटायास लावणें.

**निकड लावणें.** नेट देणें, ताण देणें, ओढ देणें, टुमणी देणें, उंवचणें, उंवचळणें, भार लावणें, ताधरावणें, तांतडवणें, खटाळणें, टाचळणें, दपटणें, दामारणें, पिटवणें, घायतावणें, आग्रह करणें, गांजणें, तांतड - तांतडी लावणें - करणें, उठावणी - घाई - चुळचूळ – घायकूत करणें, गळ – गळ - ग्रह घालणें, चिथावणें, तगादा करणें – लावणें.

**निरंतर.** नित्य, शाश्वत, शाश्वतिक, शाश्वतीचा, जाथूचा, सतत, संतत, अनंत, अखंड, अविरत, अनवरत, अनारत, अव्यवहित, नियत, चिरस्थाई, चिरकालस्थाई, नित्यस्थाई, सर्वकालस्थाई, सर्वकालीन, सार्वकालिक, खडा, नित्याचा, नेहमीचा, काईमदाईम.

**नीच.** हलका, लहान, हलके पदवीचा, फाजी, पामर, अधम, प्राकृत, निकृष्ट, हीन, हीनजातीचा, हीनकुलाचा, क्षुद्र, क्षुल्लक, अकुलीन, हीनकुल, हीनजात, कमजात, नीचकूळ, हीनजाति, इतर, सडासारवण्या, झाडलोट्या, पोतेऱ्या, हटाऊ, शिटाऊ, बाजारी.

**नेमस्त.** परमिताचारी, अल्पभोगी, अल्पविहारी, स्वल्पभोगी, नियतवर्ति, नियतवृत्ति, आहार विहार नियमवान, अल्पसंतुष्ट, अनतिक्रमी, अतिक्रम वर्जी.

## प.

**पट्टी.** (वस्त्राची) धांदोटी, धांद, चिंदोटी, चिरफळी, चिवा, ओल, फडका, फडकें, फाळ, फाळा, फळी, परकळा. (वांबूची वगैरे) कांब,

कांबीट, कांबट, कांबटी, चिपोटा, कांडी, काडी, पिंजूरी, बेळ, शोळ, सरी ( धातुची ) कांब, ( जमिनीची ) चिरटी, चिरोटी, दांडा, पट्टा, पाटी, फाळकी, फाळी.

**पर्वत.** डोंगर, पहाड, गिरि, नग, शैल, अद्री, भूधर, धरणीधर, रणोकीलक, अचल — माथा, शिखर, नगमूर्द्धा; तळघाट; आडवण; घाटमाथा.

**प्रगट करणें.** जाहीर — प्रसिद्ध — उघड — विदित करणें, सांगणें, लोकांत — चौघांत सांगणें - आणणें, प्रगटणें, परिस्फूट - परिस्फोट - प्रकाश - प्रसिद्धि - उघडीक — लौकिक करणें; घोषणा - उद्घाटण करणें — गाजवणें, चौघांत - पाचांत — दाहांत — शंभरांत, षट्-कर्ण - षट्कर्णी करणें, तोंडावाटे काढावें आणि देशांतरासदवडावें, गूल - गजर - बोभाटा - बाजार करणें.

**प्राण घेणें.** जिवें मारणें, जिवानिशीं मारणें, मारून टाकणें, जीव - प्राणघेणें, वधणें, हिंसणें, हाणणें, वध — हिंसा - हत्या - खुन करणें, निवटणें, विदारणें, मथणें, गतिदेणें, गतीस लावणें - मिळवणें, लोकांतरास - ऊर्ध्वपंथास पितृलोकास लावणें - पाठवणें; लोकांतरगत करणें, काटणें, कापणें, कापूनकाढणें, कत्तल - कट्टा — काटाकाटी करणें, मारूनखस्त — पस्तकरणें, सप्पी - सफेजंगी उडवणें - करणें, पूर्णाहुती करणें, बळीदेणें, सूदणें, निकृंतणें, निकृंतन - निकंदन - सूदन - कंदन करणें.

**प्राणसखा.** दोस्त, दोस्तदार, वेल्हाळ, गुणवेल्हाळ, दिलभर, कांन, कंथ, नायक, प्राणजीवन, प्राणाचा वाली, प्राणनाथ, प्राणपति, प्राणेश, प्राणप्रिय, प्राणविसावा, जिवाचावाली - सखा - पिहू, रमण, राघो, राघू, राज भंवार, राजहंस, दयित, वल्लभ, सजण, जिवित्रेश, प्रीतिपात्र, प्रियतम, यार.

**पळमात्रांत.** एका चुटकींत, त्रुटींत, त्रुटीमात्रांत, इतक्यांत, इतक्या मध्यें, उठाउठी, उभाउभी, उभ्यांउभ्यां, उभ्या उभ्यानी, खडाखडी, खडीचोट, खडोखड, चुटकन, झटकन, चटपट, चपकन, झटपट, झटझट, झडकन, झडझडां, झणझणां, झपकन, झपझपा, झरकन, झरझर, टपकण, झपझप, झडकन, झरझरां, टपटपां, तडका तडकी, तडका फडकी, हातनेहातीं, होहोंम्हणतां, होहों म्हणतां, चटाचट, झटा-

झट, झटांझटीं, झटार्टी, झपार्पी, झराझर, पानास चुना लावीतों, पापणीस पापणी लावीतों.

**पळून जाणें.** पळणें, पळकाढणें, बाराकरणें - ह्मणणें, बाराचा फाडा वाचणें, बाराचे लेखवाचणें, पळपट - पळण, तार्टीकापणें, गच्छ - गच्छंतीचें - गच्छंती - पोबारा करणें - ह्मणणें, यःपलायाचें, यःपलायन — यःपलायन करणें — ह्मणणें, शेपूट - शेपटीझाडणें, झुरकणें, अथवासुंझा करणें.

**पाठ पुरवणें.** पाठ घेणें, पाठीस लागणें, खणा खापटीस बसणें — लागणें - येणें, गळांचिपी आवळणें - धरणें, गलचिपीस — बगोटीस बोकांडीस — गरगोटीस - गोकटीस - मानेस - मेखाटणीस - नरडीस बसणें, दुमाल्यावर - पल्यावर — पिछावर असणें, गळग्रह घालणें, गळीपडणें — लागणें, खपाटीस बसणें - लागणें, खणतीघेणें, खणपट घेणें, खणकुदळ घेणें, राशीस लागणें — बसणें, बगोटी धरणें, दुमचीपुरवणें, टाचलणें, धोंडावणें, डीचणें, खटाळणें, ल्हट्टकरणें.

**पाणचट.** पचपचीत फळफळीत, फिका, फिकट, गळगळीत, कळकळीत, खळखळीत, पाणवल, पिरपिरीत, मचमचीत, मळमळीत, मळमळीत, डुळडुळीत, लबलबीत, कवकवीत, वाहवरा, उंबला.

**पाणी.** जल, उदक, आप, नीर, अंबु, तोय, जीवन, पानीय, पय, सलिल.

**पात्र.** बासन, तामण, भोजनपात्र, तबक, तबकडी, ताट, ताटली, पत्रावळ, विस्तारी, पान.

**पायपोस खाऊ.** सुडका, सुडका, खेटरखाऊ, पैजारखाऊ, खासडखाऊ, हुसभाई, हुल्लामाणूस, गावाचा खरवड, बाजार, बाजार भरणा, शिराऊ, ढासरी, फजीतखोर, दर्भ्या, गाढवाचा खरारा, गाढवाचा सदका, शाहण्याचा सदका, पाटीनलें मास. फटलंडी, चांडालमूर्ति, गाहाण, केहीवाला.

**पंजी** गाठोडिं, भांडवल, मुद्दल, बिसात, गठडें, लठ्ठा, ऐपत, ऐवज, जड, मूळ, मूळधन, माया, निवी, केवा

**पुरुष.** बाप्या, माणूस, मनुष्य, मर्द, मानव, मानुष, जन, नर, मनुमुनुज, गडी.

**पैका.** पैसा, धन, दाम, द्रव्य, वित्त, टका, कवडी, दुडू, पैसाअडका, पैसाटका, पैसारुका, सोनेनाणें, दामाजीपंत.

## ब.

**बंडखोर.** बंडी, बंड्या, दंगेखोर, दंगेबाज, खलेल, टोंग, ठोंग, धाम, धुम्या, धुमाळ्या, पुंड, मवास, मवासी, शिरजोर, धांदल्या, हुरदंगा, उद्दाम, उरमट, दांडगा, दंडेल.

**बंडाळी.** गडबड, हडबड, हडबडी, गलबल, दंगा, दंगाधोपा, हंगामा, दंगल, धांदल, धांगला, हुलकट, हालहूल, हूलचाल, हुलड, हुल्लड, हूल, खूल, बंडाल, गर्दी, दणका, गोंधळ, बखेडा, बैदा, गेर, धाम, धूम, धामधूम, धूमधाम, धुंदाई, अंधा धुंदी, धुंदावें, धुंदाधुंदी, धुमाकूळ, धुमाळी, धुमाफळी, माशावळण, बचमंगळ, भालेराई, ब्रम्हघोळ, अफरातफर, रोराण स्थिति. भा० सं० कोणीकोणाचा गुरू न कोणी कोणाचा चेला, कोणाचा पायपोस कोणाचे पायांत नाहीं, कोणाचे पागोटें कोणाच्या डोसक्यास नाहीं, आंधळ्याने दळावें आणि कुत्र्याने पीठ खावें, धनीना गोसावी, बेबंदराज्य झोटिंग पादशाह.

**बंदीखाना.** कैदखाना, बंदीशाळा, बंधनागार, कारागार, कारागृह, भा० सं० बिनभाड्याचें घर, ज्ञान मठ, पंडितखाना, थोरलें घर, वाडा.

**बळ.** जोर, शक्ति, कुवत, आंगवण, जोम, बळकटी, मजबुती, बळावळ, तवका, तकवा, ताकत, पराक्रम, पौरूष, प्राबल्य, तेज

**बळकट.** बलवान, बलवंत, बळाचा, बलिष्ठ, बलाढ्य, बलशाली, सबल, प्रबल, बलसंपन्न, जोरदार, जोराचा, जोरवान, जोरावर, जोरकस, जोमदार, कुवतीचा, ताकतीचा, समर्थ, सामर्थ्यवान, शक्तिमान, शक्त, जबरदस्त, जबर, पराक्रमी, प्रतापी. (वस्तु) खंबीर, खम्मल, मजबूत, कणखर, सणसर, सणसणीत, धमकट, धाडधोप, दृढ, सुदृढ, जोरदार, कुब्बल, धक्क, धट, मखम, संगीन, ऐवज, ऐवजशीर, खबरदार, जिवट. (औषध) पराक्रमी, प्रतापी, अमोघ, सतेज, तेजस्वी, गुणाचा, गुणवान, गुणकारी, वाघमाऱ्या, कसाचा, सकस, जाज्वल्य, जालीम, जलाल, झाल, ठोक्याचा, धनत्तर, वज्रप्राय.

**बायको.** स्त्री, अंगना, नारी, नार, नरी, अबला, कामिनी, महिला, वधू, ललना, ललिता, रमणी, रामा, वनिता. जा० पद्मिनी, चित्रिणी,

सौंदर्यवती, हसीनी — नागकन्या, गंधर्वकन्या, याक्षिण, अप्सरा, रंभा — कोपना, भामा, भामिनी — पतिव्रता, सती, साध्वी, सुचरित्रा, कुलांगना, कुलवधू, कुलस्त्री, कुलपालिका. (लष्ठ) फातमाय, फतेलश्कर, दमाली, दब्बू, पखालपार्वती — सुवासिनी, सौभाग्यवती, सधवा.

**बायको.** (लग्नाची) कबिला, आईल, कुटुंब, भार्या, पत्नी, जाया, दारा, प्रहीणी, वल्लभा, भामा, कलत्र, अष्टका, अर्धांग, वामांग.

**बारवर्षा सोळवर्षा.** भा० सं० नवेकालिजाचा, दंतचातूटलला, कोवळे बुद्धीचा, नवेरक्ताचा, नवेनजरेचा, नवेउमेदीचा, बच्चाजी, बच्चाराम — तुझ्या तोंडाचा जार अजून वाळला नाहीं, तुझ्या सदीच्या भ्या, घुगऱ्या खाल्या आहेत, तुझ्या बारशास मी जेवलों आहे, तुझा ओठ पिळला, तर दूध निघेल, तुझ्या ओठावर अजून दूध दिसतें, तुझ्या ओठावरील दूध अजून वाळलें नाहीं, तुझ्या तोंडाची घाण गेली नाहीं, तुझें वाल कडु अजून जिरलें नाहीं.

**बुद्धिवंत.** शाहणा, बुद्धिमान, जाणता, जान, चतुर, समजस, समजुतदार, समजदार, समजीक, ज्ञानी, ज्ञानवान, सुजाण, सुज्ञ, प्राज्ञ, ज्ञाता, विज्ञ, ज्ञानचक्षु, ज्ञानदृष्टि, सदसद्दर्शी, विवेकी, विवेकाढ्य, सविवेक, उचितज्ञ, चौरस, मतिमान, धीमान, मेधावी, सुमेधा, सन्मति, विदुर, बुध — सुबुद्धि, सुधिसुबुद्ध, ज्ञानवृद्ध, ज्ञानशाली, प्रगल्भ, प्रबुद्ध, प्रज्ञात, प्राज्ञ, बृहस्पति, बुद्धिचासागर — दीडशाहणा, दीडचतुर, अतिशाहणा.

**बेपरवा.** उदास, उदासीन, उदासवृत्ति, अनास्थ, निरुत्सह, अनिच्छ, निराश, विरोही, निचाड, अजुर्दा, बेफिकीर, निःकाळजी, अनपेक्ष, उपेक्षा, शुद्धि, निरससापेक्ष.

**बोभाट.** उघडीक, उघड, लौकिक, लोकप्रसिद्धि, जगप्रसिद्धि, रूढि, प्रकाश, ख्याति, विख्याति, परिस्फुट, पसारा, आख्या. लोकविश्रुति, प्राकट्य, बाजार, नावलौकिक, धतुराई, जघन्य, गोंगाट, गजर, गव, गवा, गुल, वाच्यता, दिवाणदरबार, धोसा, डंका — बोभाटा, बभ्राहादक, हाकाहाक, हाकाटा, हाकाटी, वाजट, धिंडवडा, कीर्तवडा, वेडा, टिमकी, धांडोरा, कुकीर्ति, आख्यता.

**बोलका.** फारबोलणारा, बोलगाढा, तोंडाचामोकळा, चावट, बोल-

घेवडा, वाचाळ, बहुभाषी, बहुभाष, मुखर, वाचरा, चाचट, जल्पक, कथाप्रसंग.

## भ.

**भक्ति.** देवभक्ति, ईश्वरभक्ति, भगवद्भक्ति, देव परायण बुद्धि, धर्म परायण बुद्धि, भक्ति परायण बुद्धि, धर्मनिष्ठा, धर्म शक्ति, ईश्वरनिष्ठा, धर्मत्व, धर्मनिर्बंध, धर्मशीलता.

**भक्तिमान.** धर्मशील, धार्मिक, धर्मी, धर्मिष्ठ, ईश्वर मनस्क, ईश्वरपरायण, परमार्थ परायण, परमार्थी, पारमार्थिक, देवभक्तिनिष्ठ, भजनी, भजनशील, धर्मनिबंधी.

**भवसागर.** भवबंध, भवचक्र, भवजाल, मोहजाल, मोहपाश, मायाजाल, मायाचक्र, विषयजाल, विषयपाश, आशापाश, संसारचक्र, संसारयंत्र, दुःखसागर.

**भूलोक.** मृत्युलोक, नरकलोक, मर्त्यलोक, कर्मभूमि, भूतधात्री, भूतग्राम. भूसंसार, मध्यलोक, जीवाजिवाधार, दिग्चक्र. समुद्रमेखला, नानारत्न वसुंधरा, दुःखसागर, चतुःसमुद्रवलयांकित पृथ्वी.

**भोजन.** जेवण, अहार, जेवा, जचें, ओरपणें, भुरकणें, (भोजन करितांवेळीं विधि करावयाचे) अंचवण, अन्न समर्पण, अन्नस्तुति, आचमन-अपोशन, आहुतीघालणें, उत्तरापोशन, चित्राहुति, नेत्रस्पर्शन, नैवेद्यदाखविणें, परिवेषण, परिषिंचन, पात्रप्रक्षालन. पात्रस्थापन, प्राणाहुति, मंडलकरणें, मौनधारण, शिखामोचन, स्थलशुद्धि, स्थलशोभा-
-अन्नव्यवहार, पंक्तिदोष, पंक्तिभेद, पंक्तिव्यवहार, पंक्तिपर, पांक्तः
— फराळ, अल्पहार, फलाहार — प्रातभोजन, माध्यान्हीक. निशिभोजन; दिवसभोजन; नक्तभोजन; कुभोजन; परान्न; जेवा; चिरबंदी

**भोळा.** मनाचा भोळा, भावार्थी. भोळाभावार्थी, सालस, साबडा, भाबडा. साधा, अजाणता, निवळ, बाळबोध, ऋजु, साळसूद, साळढाळ, साळाभोळा, भोळाभोळा, निष्कपट, अकपट, निष्कृत्रिम, अकृत्रिम, शुद्धमति, निष्प्रपंच.

## म.

**मगरूर.** उद्धट, दांडगा, उरमट, बदमस्त, मस्त, मस्तवाला, शिरजोर

उन्मत्त, चढेल, माजोरी, निलाजरा, शेफारलेला, माजलेला, भांवेल.

**मंदबुद्धि.** जड, मंद, मंदमति, बुद्धिमंद, मतिमंद, धनबुद्धि, जडबुद्धि, अप्रबुद्ध, असमंजस, मूढ, मूढमति, मंद, मूर्ख, आडमूढ, आडमुठ्या, धेलन, घलाड, स्थूल, स्थूलबुद्धि, दुर्मेधा, निर्बुद्ध, निर्बुद्धि, टोमर, माठ्या, मठ्ठ, दगड्या, मठ्या, अज्ञान, ज्ञानदुर्बल, गयाळ, गुंगा, गंदा, गैंवल्या, गंवी, गाफल, बेकूब, हीनचातुर्य, दुघडभोनाम्या.

**मन.** चित्त, अंतःकरण, मानस, जाणीव, चित्तवृत्ति, चित्कला, चिच्छक्ति, मनोवृत्ति, चिदाभास, साक्षिदेश, पोट, अंतर, अभ्यंतर. ध्यान — मनदेवता, मनपिंगळा, मनपिंगळा, मनुबाई, मनाजीपंत, मनसाराम, मनाजी पाटील.

**मनाचा मोकळा.** मनाचासाफ, अकपट, निष्कपट, मनाचानिर्मळ, निर्मळमनाचा, निवळमनाचा, साळढाळ, निष्प्रांजल, प्रांजल, मनाचापाक, दिलपाक, हळवळा, हळवळीत, प्रशस्त, साळस, सरळसरळबुद्धि, खडखडीत, खणखणीत, धळधळीत, पलवळीत, धळमळीत, शुद्धमति.

**मनोदय.** चेत, मन, बुद्धि, मनसुबा, उद्देश, मतलब, इंगित, मानस, आशय, निमित्त, अभिप्राय, अभिप्रेत, हृदय, हार्द, संकल्प, कल्पना, विविक्षा, चिकीर्षा, विषय.

**मरण.** अंत, अवसान, देवाज्ञा, निधन, काल, निर्वाण, प्राणोत्क्रमण, प्राणांत, देहावसान, देहत्याग, देहयात्रा, देहांत, देहविसर्जन, दीर्घनिद्रा, महानिद्रा, कालनिद्रा, महाप्रस्थान, कूच, महापथगमन, निर्वाण, शांति, निवृत्ति, निपात, निस्सरण, परलोकगमन, पंचत्व, पंचता — काळ, काळसर्प, कृतांत, यम.

**मरणें.** देव आज्ञा होणें, निवर्तणें, जाणें, वारणें, गमावणें, गतणें, गतावणें, निजणें, निमणें, गुजरणें, गतहोणें, देहपडणें - जाणे.भा ०सं० गुंडाळणें, आटपणें, उरकणें, खपणें, संपणें. उलथणें. खटारणें, घडघडणें, चचणें, चंचरणें, चसणें, जाजावणें, टोळपणें, करोटहोणें, गबाळें आटोपणें, गाशा गुंडाळणें, डोळेझांकणें, बिऱ्हाड आटोपणें, गडडीहोणें, पंथास पोहोंचणें, चसना पुरास जाणें, धोंड्याखालीं येणें,

रात – कृष्णवर्णहोणें, रामह्मणणें, रामहोणें, रूप्याचे डोळेकरणें, प्रस्थान गुंडाळणें - आटपणें – बांधणें, प्रस्थान चालणें, न येण्याचे वाटेनें जाणें, निजधामास जाणें, वरजाणें, स्वर्गवासी – कैलासवासी – वैकुंठवासी होणें, लोकांतरगत – दिवंगत होणें — तिळतिळप्राण सोडणें, खातांजेवतां – चालतांबोलतां मरणें, भरल्या घोसानें मरणें, पुढेंवाढलेल्या पानास लात मारणें.

**मरणोन्मुख.** कठीण, अत्यावस्थ, अत्यवस्थ, आसन्नमरण, आसन्न मृत्यु, मरणाभिमुख, गंतुकाम, गतीवर घातलेला, नाकोंसून धरलेला, नाकावर कापूस ठेवलेला, उत्तरपंथ धरलेला, उत्तरपंथास लागलेला, घटकाड्याचा घातलेली.

**मरतमढें.** इंद्रमढे, मरतुकडें, करपटसड्या, गिरा, गिरावळ, पांढरपाल, कांखा, हाडांचापिंजरा, काट, पाप्याचें पितर, झुडतर, झडतकारू, मृत्युगोदान, सापळा, हत्या, दिपाचा कवडा.

**मरायास टेंकणें.** यमलोकाचा वाट धरणें, पंथासलागणें, कंठींप्राण उरणें, डफघाईसयेणें, नाडीआटपणें, कांठी शिखरास लागणें, तंतींप्राण उरणें, जीवखळवटणें, उत्तरपंथास लागणें, घुटमुळणें, घुटवळणें.

**मारणें.** बुकलणें, बडवणें, झोडणें, पिटणें, ठोकणें, कुटणें, कुचलणें, कुबलणें, कुदकणें, कुमकणें, कुमलणें, झोडपणें, दांडकणें, दांडगणें, दांडाळणें, दुबकणें, सोटाळणें, टोलणें, कुंदळणें, धोपटणें, चेंनणें, ठेंचणें, धमकणें, बुकलणें, सडकणें, घोळसणें, घोळसावणें, चोपटणें, चोपणें, सोपरणें, कांडाघालणें, पिकवणें, लाता बुक्यानीं तुडवणें, बळकट मारणें, हातटाकणें, अंगाचें धुरकेंउडवणें, कुंदीकाढणें - गाजवणें, गूणकाढणें, टाकें ढील करणें, बरडेलकाढणें, कुच्याकाढणें, पूजाकरणें, तेलकाढणें, मारून भूसभरणें, बुक्यालाता सडकणें, त्राटणाचें घालणें, मारतां बोथभरणें, डोळेपांढरे करणें, चांबडीं लोंबविणें; कुट्टाकाढणें, मारकूट - मारझोड -मारपीट - माराकुटी करणें, फरमाशी मार -पलाखतीचा मार - तंबीमार - देणें, मारून उरतांनठेवणें, मारूनपीठ – पिठारकरणें, हाडेंमोकळींकरणें, कणीक मऊ करणें.

**मिसळ.** मिसळा, भिसळ, मिळवण, भेरड़, पंचमिसळ, पंचभेळ,

पंचमेळ, गोतांबोल, गोहोत, खिचडी, भेडगुजरी, खिचडमिचड, गिजगिंदा, कालवा.

**मीपणा.** अभिमान, अहंकार, दम, गुमान, दिमाक, पत्रास, रग, खी, फुंद, खेरी, डब, माज, बदमस्ती, मिजाज, मान, आढ्यता, अहंमान, अहंमति, आत्माभिमान, स्वाभिमान, अंतरहास.

**मुक्ति.** मोक्ष, अपवर्ग, कैवल्य, उद्धार, उद्धारयत, उद्धारण, सिद्धि, विमुक्ति, निरियाण, ब्रह्मसुख, ब्रह्मसायंत, ब्रह्मनिर्वाण, निर्वाण, ब्रह्मप्राप्ति, निश्रेय, श्रेय, महोदय, निवृत्ति, निर्वृत्ति, अपुनरावृत्ति, अपुनरभवशम, शिव.

**मुख्य.** प्रथम, पहिलाप्रथम, मुखरण, मुखरीण, आदि, आद्य, आदिम, अग्रगण्य, अग्रणी, अग्र, अग्रसर, श्रेष्ठ, उत्तम, परम, प्रधान, प्रमुख, प्रमर, विनीचा, खासा, राजा, वर, वर्य, सिंह.

**मुशाफरी वाता.** सातहात तवसें नवहातवी, सांगासांगी वडालावांगी, सातहात लाकूड नऊ हात ढल्पी, नीळनासली, निळीचा रंगनासला, त्या लंकापाहिलीसतर कायझालें भ्या पडलेंका पाहिली.

**मूर्ख.** बैल, गाढव, अकलेचा गधडा, धोंडा, नंदी, नंद, नंद्या, नांदा, नरपशू, घोरड, दगड, खुळेश्वर, ठोणपा, टोणपनाथ, टोणपशुद्ध, टोणपेश्वर, ठोंब्या, उल्लू, पथर, वांठींचापिता, देवापुढचा देव, उम्या, देवानांमाप्रिय, शंख, शुंठ, मात्या, शामाध्या, शतमूर्ख, शुद्धस्फटिक, शुद्धबुद्ध, राजा, ढ, शाहण्याची खरवड, गाढवाचा खरारा, बुद्धीचा नवसागर, बुद्धीचा खंदक, माणसाचा कोंढा, माणसाचा अवतार, घोड्याचापूत, झळझळीत मूर्ख, निपट मूर्ख, ठंठणपाळ, गाढवीचा, मूर्खशिरोमणी, वेडोहळद, शेंड्यावर बसून झाड तोडणारा, शांड.

**मोठा.** थोर, थोरला, मोठाथोरला, टणक, महान, महा, स्थूळ, गुरू— धडेल, धडल्याव, धडींग, धजेल, धडेल, मोला, गबदूल, गाबदुला, मोठाधाटा, मोठाझपाटा, लडदू, गडदू, भलेलठ्ठ, गलेलठ्ठ, रठ, रटेल, रटाला, भकम, जबर, जबरा, ढमाल्या, अगडबंब, मस्त, मातबर, बोका, गजेंद्र — बोजर, अवजड, झाबड, बंब, अफाट, भवाढव्य, अढाळ, बंबाळ, मखम, ऐवट, कचक्र, विशाळ, धनत्तर, धक्कर — लठारणा, बताडा, दंडारणा, जबरा, ठस, ठलठसीत, पोक्ता, पोक्त.

## य.

**यजमान.** पोशिंदा, पोषक, पालक, मुरब्बी, आश्रय, आश्रयभूत, आश्रयस्थान, कैवारी, मददगार, पक्षधारी, पुरस्सकर्ता, हिमाईती, हिमाईतदार, पोशिंदा, पाठीराखा, ठासर, तणावा, बाजू, प्रणतवत्सल दीनवत्सल.

**यातना करणें.** जामगी लावणें, कानास चाप लावणें, राखेचा तोबरा देणें, उरावर - डोईवर - धोंडा देणें, तव्यावर उभाकरणें, करवतावर धरणें — ओढणें, मिरच्यांची धुरी देणें, सांडस टिपऱ्या लावणें, उखळांत - चरकांत घालणें, खोड चारणें - खावोवणें, नखीं नख देणें - बोटास पलिते बांधणें, पाठीवर तुळई ठेवणें.

## र.

**रगड्या.** रपाट्या, रगडमल्ल, धपाट्या, दपटनंदन, धसकट्या, धसक्या, धसट धैंदा, धसक नंदनें, धसमुसळ्या, धसमसूळ्या, धडबड्या, धडफड्या, धड्या, लाथ्या, लाथ्याप्रगाजी, उरमठ, हूड, हुंदडा, कपाळफोड्या, हुर्योहुर्यो करणारा, उड्या, खमळ्या, खणक्या, खमशा, खंदा, खंदातट्टू, फट्या, फट्यावावरा.

**रगडून.** रपाटून, खसाटून, दपटून, तडकाऊन, तडकून, कडकाऊन, कडकडून, धशाफशा, धडपून, चडपून, घसरून, धडक, धडका, तडकां, चराचर, फटकर, बेधडक, बेलासक, बेनिसवन, दाटबळें.

**रण.** लढाई, युद्ध, संग्राम, विग्रह.

**रागीट.** तापट, तापड, क्रोधी, कोपी, कोपट, रागिष्ट, कोपिष्ठ, क्रोधिष्ट, तापिष्ट, संतापित, क्रोधशील, कोपशील, शीघ्रकोपी, चिरडखोर, चिरडीखोर, चिरड्या, चिडचिड्या, चिरड्या, जलद, उष्णपित्तवेगी, पित्तप्रकृति, पित्तस्वभाव, पितळा, कोपवान, क्रोधवान, तामस, तमोगुणी, तमस्वी, क्रोधवश, क्रोधाधीन, रौद्र भा० सं० रुद्रावतार, जमदग्नी, अक्रातारुद्र, आगजाळ्या, तुफान, सैतान, आग्यावेताळ, आग्यामरूनि, ओलीआग, जळताआग, ओलाभाग, अनितांई दैत्यांशी, दैत्यपुरुष, पंचानन, साक्षात्दैत्य, खाकीगोसावी, जिवंतपिशाच, खवीस, सकृद्दर्शनी तापणारा — उसळणारा, ज्यास पाण्यांत देखील घाम येतो.

**राजा**. राव, राय, राणा, छत्रपती, नरेंद्र, नरेश्वर, नरदेव, नरपति, नराधिप, नृप, नृपति, भूपाल, महिपाल, भूप, भूपति, लोकपाल, पार्थिव, प्रजापति, राजतिलक, राजमुगुट, राजमुगटमणी, राजचूडामणी — राजाधिराज, राजराज, राजाधिप.

**रास**. ढीग, ढिगार, गोळा, जमाव, पुंज, पुंजा, गंज, पिंड, सांठ, साठा, मेळावा, संग्रह, संचय, संघास, संचित संभार, संघ, समूह, समुच्चय, एकपुठा, वृंद.

**रेलचेल**. महापूर, उपट, घमंड, चंगळ, चंगळपट्टी, चंगाळ, मात, रगरपट्टी, रगड, रगाडी, धबूक, चंगळवटी, रेंगळ, रेड, गज्जक, रेळ, लेलूट, मार, लूट, शरद, आबादानी, अमनचैन अहेनचहेन, गर्दी, झिंबडी, ढेल, बहार, बस, पराकाष्ठा, [illegible], धमधमाट, चळचळाट, चेळ, चेहळ, चेकळ, गडगंज, घमशान, झिंबड, ठेल, झोड, दिवाळी, ढु, धूमड, धूम, धूमशान, धूमधक्की, भडीमार, मारामार, टसर, लखलूट, लखलोट, शीगलोट, धुंबड, देवड, चौकळ, लोट, झुंगड.

**रोडणें**. आंग टाकणें – सोडणें – साडणें, चोपणें, चोपटणें, चुंबणें, टकलणें, पचणें, क्षिणणें, खंगणें, लंघणें, गळणें, साळवणें, गंदाळणें, झडणें, झरणें, झुरणें, झुकणें, घसरणें, अटणें, रोडावणें, झिजणें, झिरकणें, झिरणीत लागणें, कृश होणें, कटीपातळ होणें, काष्ठहोणें, शरीराची टगाळ होणें, पोटाचा कपोता वळणें.

## ळ.

**लठ्ठेश्वर**. लठाश्रम, लोठाश्रम, लठ्ठामिश्र, वृथापुष्ट, ठोंबा, ठोंब्या, ठोंब, शुंभ, लोथडा, लोथा, सोट, झशा, झशागुगूळ, मद्या, ट, नंदी, रेडा, मेंद, टब्बु, भचव्योजी, अभव्योबा, कंठाळ्या, [illegible]णुस, मसणखुंट, टोणपा, लठ्ठभारती.

**[illegible]ड** खोटें बोलणारा, असत्यवादी, असत्यवक्ता, मिथ्याभाषी, मिथ्यावादी, अनृतवादी, अनृतभाषी — सातलबाड, लबाडांचा राजा - [illegible]प. आ० सं० खन्यापेंसाठ, ज्याचे जिभेस हाडनाहीं, हा लबाडबापू नव्हे, वडाचीसाल पिंपळाला आणि पिंपळाचीसाल वडाला लावणारा, कुंभ्याचा पाय मांजरावर आणि मांजराचा पाय कुंभ्यावर घालणारा.

**लांच्छन.** डाग, कलंक, काळवटी, काळवण, काळें, नाव, नाम, ठपका, बट्टा, कालिमा, काळोखी, मस, बाट, खोड.

**लुटणें.** नागवणें, बोडणें, नाडणें, लुगारणें, लुचाडणें, लुबाडणें, बुचकणें, घासणें, झासटणें, लुंववणें, धाब्यावर बसवणें, मुंडणें, भुणें, धुऊननेणें, घरभुणें, पोखरूनखाणें, पिळूनघेणें, शुद्धबुद्ध करणें, नागवणूक – मुंडण – मुंडोमोचन करणें.

**लेंकरूं.** पोर, पोरगा, मूल, मुलगा, पोंगडें, संतान, बाल, बालक, अपत्य, शिशु, अर्भक, केलांडू, बचडा, पोरसोंदा, — लेकपून, लेकबाळ, मूलबाळ, पोरसोळ, पोरबाळ — बावा, बा, बाबा, छावडें, छावडा, छकडें, बचडा, बाबल्या, लबाड, वत्स, सोनकुला, सोनक्या, सोंनटका, सोन्या, बेटा ( मुलगी ) बया, बचडी - पोरटा, कारटा, पोरटा – शेंडफळ, सरल्या पालवाचें मुलगें - मुलेंबाळें, पोरेंबाळें, मुलेंलेकरें, लेंकरूंबाळ, चिल्लींपिलीं, कच्चेबच्चे, पोरेंसोरें, बालापत्य, बालखिलें.

**लोकोपकारी.** जनोपकारी, परोपकारी, सर्वोपकारी, विश्वोपकारी, जगउपकारी, परोपकार बुद्धि, लोकोपकार बुद्धि, परोपकार शूर, जनप्रिय, जनवल्लभ, जनहितेच्छू, जनहितैषी, सर्व, कार्यकर्ता, विश्वमित्र, जगन्नमित्र, विश्वकुटुंबी, जगद्वत्सल.

**लेंभें.** झोंबट, खटलें, लफडें, लटांबळ, लेझपेंड, लडथड, लभांड, लिगाड, झट, लोंचा, खरकटें, हगलें मुतलें, घाण.

**लोभी.** लालची, हवरा, लालचखोर, अहोपी, लोभिष्ट, लोभान्वित, लोभयुक्त, सोसघेवडा, लाभाळू, हव्यासी, वराडी, अभिलाषी, लुब्ध — लोभाधीन, लोभग्रस्त, लोभमय, लोभात्मक, लोभाविष्ट, लोभाक्रांत, लोभाकुल, लोभातुर, सर्वार्थी. भा ० सं ० आशाभूत, आपलपोट्या, आपल पोटान्या, पुढलेंपान ओढणारा, आत्मंभरी.

## व.

**वश होणें.** दमणें, दबकणें, भांडायास - लढायास – वाद करायास सोडणें, हरघेणें - पत्करणें, मानणें, हारी - हार - अजीत - शरण जाणें, हातटेंकणें - जोडणें, बें - ची - जीझगणें - करणें, दांतीं - तोंडींतृण धरणें - घेणें, आधीनता पत्करणें, शरणांगत होणें.

**व्याध.** उपाध, जाच, व्याधि, नड, पीडा, कांटा, कंटक, ग्रह, दांहावाग्रह, खूळ, मड, धाड, आगधाड, जंजाळ, झट,* पालिस्त, कलांट, झोंबट, बलागत, खेकटें, खटराग, सल, शल्य, सुदर्शन, विवशी, शनि, लचांडी, शुष्ककाष्ठ, जिंद.

**वारा.** वायु, पवन, वाव, हवा, वात, प्रभंजन, समिर, अनिळ, मारुत. प्र ० उगवता वारा, उत्तर वारा, अ ० उत्तराण, सातरस, उपर बाहेरचावारा, दक्षिणवारा अथवा डांकीण, चिल्या, हेट बाहेरचा वारा, मावळत वारा.

**विक्राळ.** उग्र, उग्रबारगा, खपती, जहाल, जालीम, जलाल, आग्या, कजाख, कट्टा, कडक, खंदा, दारुण, उग्रकर्मा, जाज्वल्य, प्रखर, चंड, प्रचंड, राक्षसी, आसुर, व्याघ्रमुख. भा ० सं ० यम, यमरूप, यमदूत, कालपुरुष, कालस्वरूप, कालरूप, कालरूपी, कल्पांतकाळ, कर्जतकाळ, कृतांतकाळ अथवा कर्दनकाळ, कृतांत, प्रलयकाल, राक्षस, भडेराक्षस, आग्यावेताळ, रुद्रावतार, जहरी मोहरा, आवसा वरचा वाघ, तुफान, पंचानन, कजाख, जितासंबंध, दैत्यांशी.

**विकार.** ( मनाचा ) मनोधर्म, मनोवृत्ति, वृत्ति, विकृति, भाव, राग, रस.

**विद्वान.** पढलेला, पढीक, शिकलेला, विद्याविशिष्ट, विद्यासंपन्न, साक्षर, शिक्षित, व्युत्पन्न, अध्ययन संपन्न, विद्यावान, लब्धविद्य, अभ्यस्तविद्य, कृतविद्य, विद्याशाली, बहुज्ञ.

**विध्वंस करणें.** मोडणें, मोडून – तोडून टाकणें, मोडून – पाडून – भंगून टाकणें, पाडणें, धुळीस मिळवणें, जमीनदोस्त करणें, सपाट करणें, पाटा वरवंटा करणें – फिरवणें, ध्वंस – ध्वंसन – प्रध्वंस, – संव्हार करणें, नाहींसा करणें, नष्ट करणें, उच्छेदणें, निर्दाळणें, उपहंती – सहंती करणें, गाढवाचा नांगर फिरवणें — नासणें, नासून टाकणें, नाश – सत्यनाश – विनाश करणें, सत्यानास – सत्याळ – नासाड – नासाडी – नासाडा – चंदन – गोपचंदन – नासधोस – नासधूळ – धूळ – धूळधाणी – धूळदशा – धूळधमासा – धूळपट – रद्दाधूळ – तसनस – वर्तुळाकार – माती - चुना – पीठ – पिठाड – राळ – पठाडा – राखरांगोळी, निर्दळण -

फन्ना करणें, सप्पा मिळवणें— उडवणें — करणें; धुव्वा उडवणें — करणें, पस्त — नाबूद करून टाकणें, रसातळास नेणें — जाणें, भंग — भंजन — हानि करणें.

**विनंती करणें.** विनवणें, प्रार्थणें, याचणें, अर्थणें, विनवणी — प्रार्थना — याचना — अर्ज — मिन्नत — मिन्नत — मिन्नत — बारी — मिन्नत माना करणें, पाया पडणें, हातापाया पडणें, पाय धरणें दाढी धरणें, दाढीस — हनुवटीस हातलावणें - पाय धरणी करणें, पदर पसरणें, हातांपायां पडून प्रार्थणें — अर्ज करणें, नाक घासणें, नाकदुरई काढणें.

**विलासी.** भोगी, विहारी, रंगी, रंगेला, रंगेल, चैनी, गुलहंसी, हंसी चंदनहौंशी, मौड्या, मौजाळा, हौशा, शौकी कौतुकी भा ० सं ० खुशालचंद, कृष्णावतार, सुखानंद, घमंड, घमंडानंद, घमंडानंदी.

**विषयलंपट.** विषयी, विषयपरायण, विषयरत, विषयोन्मुख, विषयासक्त, विषयवश, विषयाभिमुख, विषयाविष्ट, विषयलंपट, विषयतत्पर, विषयलीन, विषयलुब्ध, विषयतल्लीन, विषयसुख लुब्ध, राजस, रजोगुणी, आशाबद्ध, आशापाश निबद्ध.

**वीर.** शूर, मर्द, मर्दमाणूस, गाजीमर्द, मर्दगाजी, गाजी, जवानमर्द, धारराव, धारकरी, युद्धवीर, योद्धा, रणशूर, रणधीट, रणधीर, रणसिंह, रणसिंह, अतिरथ, महारथ, तरवार बहादूर, समशेर बहादूर, दिग्विजयी, बावनवीर, अप्रतिभट, धेंड, भरतीवीर, वाघमाऱ्या, परशुराम, युधिष्ठिर, भीष्म, वज्र, तोंडी लागणारा, शूराशिरोमणी.

**वेडसर.** अवतार, अवतारी, अवतार घेतलेला, वेडापीर, कपाळफोड्या, पिसाट, उरफाट्या काळजाचा, उफराटें काळीज, आनताई, भस्मासुर, उत्पाती, साहसी, साहसिक, साहसकर्मा, उग्रकर्मा, घोरकर्मा, राक्षस, जीवावर उदार, ज्याचेंकाळीज पाठीस आहे, पाठीच्या काळजाचा, रगड्या, रपाट्या, खंदातट्टू, शेखचिल्ली, भोलीभांग, दिग्विजयी, वली, मारीन कीं मरेन ह्मणणारा, नाहींतेंच करणारा, हातावर शीर घेऊन असणारा, शेंडीतुटो कीं पारंबीतुटो ह्मणणारा, देहंवापातयेन अथवा साधयेन ह्मणणारा, मागेपुढें न पाहणारा.

**वेडा.** पिसा, दिवाना, वेडलागलेला, वायचळलेला, खुळा, पिसाटीक, चळेल, नष्टबुद्धि, भ्रष्टबुद्धि, हतबुद्धि, विक्षिप्त, उन्मत, धंद्र, धंद्रट — धोंडे मारणारा – फोडणारा, दगड मारणारा, पिसाळलेला, पिसें लागलेला, भरतें आलेला – वेडाखुळा, वेडापिसा.

## श.

**शरीर.** अंग, देह, काय, कुड, कुडी, तनु, तन, कलेवर, पिंड, वपु मूर्ति – भूतात्मा, धाम, क्षेत्र, पंजर, विग्रह, झाड, भोगायतन, रोगभू, प्राणसद्म, इंद्रियायतन, इंद्रियग्राम, भूतग्राम, कायापूर, अहंकाराशय, अहंकारा सद, जायजणेंघर, जायजणीवस्तु, मुरकुंडी, गोळा, मोक्षगोळा, मोट, गठडी, लोट.

**शहाणा.** चतुर, कुशल, चातुर्यवान, पटु, दक्ष, विचक्षण, सुगर, सुवड, खबरदार, कलावंत, काबील, सुबुद्धि, कुशलबुद्धि, चंच, चंचीबाग, चंचूबाग, बाट, खंदा, कौशल्य शाली, प्रभू.—करामती, हुन्नरी, अटोकाट, जाहंबाज, पटाईत, सराईत, बहादूर, बाजिंदा ( लिहणार - बोलणार - धावणार - कारकून ). खबदार, पक्का, पुरा, जोतदार, धुरंधर, धुरीण, धनुर्धारी, धनुर्धर, अवधानी, संधानी, अष्टावधानी, अष्टसावध, अष्टपैलू, चौरस, लौकिकी, पुढच्याजोताचा, मेख्या, कट्टा, खडाण, दलदपट, कागडा, डिवरा, कर्ता, कर्तुमकर्ता. भा ० सा ० जेथें लात मारील तेथें पाणी काढील, गुणी, गुणनिधान, गुणग्राम, गुणनिधि, गुणिजन, गुणपात्र, गुणराशी, गुणसागर, गुणाकर, गुणाची रास, गुणाची खाण, बहूगुणी, गुणसंपन्न, बत्तीसगुणी, सहस्रगुणी, गुणाढ्य, बत्तीसलक्षणी, बावनबीर, हरभास, हरहुनरी, हरकामी. किं ० हरकाम्या, कसबी, हरकसबी, सररास, महारथी, मोहोरा, बिरबल, दीक्षित, फरडा, फाकडा, सोमाजी सकलकळ्या, चतुर सावाजी.

**शिरस्ते वाईक.** लोकसिद्ध, लौकिक, लोकाचाराचा, जनाचाराचा, लोक प्रचारातला, लोक पद्धतीचा, लोक रूढींतला, रीतीचा, मार्गाचा, रूढीचा. शिरस्ते माफक, दस्तूर माफक, यथा पद्धति, यथासंप्रदाय, संप्रदाया रूढ, संप्रदाय सिद्ध, संप्रदायानुसार, सांप्रदायिक, व्यवहारिक.

**शूर.** छातीदार, दिलदार, हिय्येदार, हिम्मतदार, हिम्मती, धाडसी, छातीचा, हिम्मतीचा, शौर्याचा, निधड, निर्भय, भयहीन, धीट, साहसी, मर्दा, जवान मर्द, बहादर, शौर्यशाली, शौर्यवान, शौर्यसंपन्न — धीट, उत्पाती, खेदा, साहसी, निर्वाणी. भा० सं० हातावर शीर घेऊन असणारा, उरफाट्या काळजाचा, पाठीच्या काळजाचा.

**शूरत्व.** हिम्मत, हिय्या, छाती, दिलदारी, मर्दाई, मर्दुमकी, मर्दी, अवसान, आव.

**शेजारी.** पडोसी, शिवशेजारी, शिवधडी, शिवधड्या, निकटवासी, प्रतिवासी, सामंत, सामंत वासी, हमसाईदार — शेजारी पाजारी, अडोसी पडोसी.

**शेत.** पीक, पिकदाव, उपज, पीकपाणी.— सुपीक, नापिक, विंबुड, मयतपाहणी – धनीवाठा, शेतवाटा, मालकवाटा, बैलवाटा, आंगवाटा.—थल, अर्धेल. निमथल, निमखाई, निमाई, तिर्थेल – एकपिकी, एकबारी; दुपिकी, दुबारी, तिपिकी, तिबारी; चौपिकी, चौबारी.

**शेतखप्या.** गांवढळ, गवार, गुरेराख्या, नांगऱ्या, नांगरहांक्या, जोत्या, क्षेत्रजीवि, क्षेत्री - आडगळचा, आडमुठ्या, कावळ्या, घोंगड्या, रानकरी, रानट, जंखनट, जंगली, वणजार दांड.

**शोधक.** सर्वशोधी, बहुशोधी, मार्मिक, जिज्ञासू, बुभुत्सु, अपूर्वदर्शनोत्सुक, श्रवण दर्शनोत्सुक, गवेषणासक्त, अन्वेषणासक्त, चौकसदार, हवसदार, हौशी, तलाशी, हुंग्या, कानवड्या, विचक्षण.

**श्रम करणें.** खपणें, मेहनत करणें — जिवावर - छातीवर काम करणें, दंड काढणें, अटाआट - अटाघाट – डोई फोड - कपाळकूट करणें, मरून - जीव देऊन - जीवतोडून काम करणें, जीवभर्षा करणें, रक्ताचें पाणी करणें, हाडें झिजविणें, हाडाचीं काडें करणें, हाडांचें मणी करणें.

## स.

**संकट.** दुःख, पीडा, श्रम, क्लेश, कष्ट, संताप, ताप, विपत्ती, आपदा, आपत्ती, विपदा, हैराणी, हैराणगत, तळमळ, अडचण, पेच, है-

ना, दुर्दशा, कष्टावस्था, कष्टदशा, हैराणदशा, हाल, कासावीसी, हळहळ.

**सटरफटर.** लटर फटर, अटर फटर, गटर पटर, खटर पटर, अलबत गलबत, अगड तगड, अगड बगड, अडगूण बडगूण, काणू बाणू, कायणू बायणू, सार सुसर इव्याखिळा, परचुरण, हेल. पैल वस्तु, पालान बिस्तान.

**संतापणें.** तडफडणें, धडपडणें, चडपणें, जळणें, जळपणें, जळजळणें, तपणें, क्षोभणें, तमणें, तळतळणें — जळफळ — चडफड — आदळआपट — आदळ उफळ मांडणें — करणें, डोक्याचा चेंडू करणें, डोक्याचें उखळ करणें, दांत ओंठ खाणें, जोरपाखडणें, मणगटें मोडणें — चावणें, आंगास मोठ मोहन्या लावणें, हिरवा पिवळा होणें, हातपाय चोळणें — आदळणें — आपटणें, तापतोबाराकरणें, दंगाकरणें, नाकपुड्या पिंजारणें, वादळणें, विदविदणें, तातावणें, कावणें, कडकडणें, चवतळणें, जळफळणें, फणफणणें, डाफरणें, चाचावणें, चिवाचिवणें, फुणफुणणें, तणतणणें, तमतमणें, खुणखुणणें, धुमसणें, दांतावणें, कावणें, कुरकुरणें — भा० सं० अंगास आग लागणें, —पेटणें, चढून येणें, रुद्रावतार धारण करणें, नर सिंहअवतारधरणें, तृतिय नेत्र उघडणें, वरदळीस येणें, लळिता वर येणें, दातीयेणें, शिखासूत्रा वर येणें, हातीं धोंडा येणें, धोंडे मारूं लागणें, डोकं फिरणें, आंगाची होळी होणें, अंगुष्टाची आग मस्तकातशिरणें — चढणें, पायांचा जाळमस्तकीं जाणें, चिरडीसयेणें, जानवें तोडायास उठणें, जानव्यास हात घालणें, आंगाचे तिळपापड होणें, आंगाचीलाही होणें, तानयेणें, भानजाणें, खवंदळणें, खवळणें.

**सत्यानास करणें.** नासाडी - नासाडा - चंदन - गोपचंदन - नासधोस - नासधूळ - धूळधाणी - धूळपट्टी - तसनास - माती - चुना - पीठ - राळ - राख रांगोळी - निर्दलन - फन्नाकरणें, सप्पा उडविणें, धुवा करणें, रसातलास नेणें, भंग - भंजन - हानि - विध्वंस करणें, निदोळणें. भा० सं० पाटा वरवंटा फिरावणें, गाढवाचा नांगर फिरविणें.

**सत्वशील.** खरा, साचा, सत्य, प्रमाणे, इमानी, इमानदार, इमानाचा, कराराचा, करारी, सत्यप्रिय, सत्यव्रत, सत्यसंकल्प, सत्यप्रतिज्ञ, परमार्थी, सात्विक, सत्यशील, सत्यवृत्ति, सतंजय.

